# सु ष मा

वामन चोरघडे

प्रकाशक :

ह. वि. मोटे, प्रतिभा कचेरी, मुंबई ४

किंमत एक रुपया

# अनुक्रमणिका

—:०:—

१

......आज तुला त्याची कल्पना नाहीं. सारं जग तुला उषेच्या सुषमेसारखं स्निग्ध आणि अस्फुट दिसत आहे. तुझ्या निरागसपणांतच तूं चूर आहेस.

......पण कुसुम ! किंचित् समज आल्यावर तूं आपल्या पापण्या वर करून जगाकडे पाहशील. तूं म्हणशील, किती अनोळखी सारं हें ! --

......तुझ्या पुढच्या आयुष्यांत असले प्रसंग वारंवार येतील. आणि वारंवार तुझ्या पापण्या ओलवून त्यावरील केस थरथरतील—भिजून जातील.

......अशा वेळी केवळ माझें म्हणून नव्हे तर एका भाव-विवश कलावंताचे पुस्तक तूं विरंगुळा वाटावा म्हणून उचल-शील—त्यांतील शब्दाशब्दांवरून ओळींओळींतून तुझी तरल दृष्टी हलत राहील. तुला आश्चर्य वाटेल— आणि किंचित् विस्फारून बघत नाहीं तोच तुझ्या ध्यानी येईल—

——त्यांत कुसुम आहे ! अगदी अशीच—हंसरी, चिडकी, विजेसारखी चंचल—अल्लड !! त्यांतल्या टपोर मोत्यांना तुझ्या डोळ्यांशिवाय किंमत नाहीं; त्यांतलीं फुलें तुझ्याच उल्हासानें हंसतात—सशाची उपमा तुलाच दिलेली

आढळेल. तुझ्याच—तुझ्याच अवस्था परिणत झालेल्या दिसतील त्यांत !! —तुला वाटेल—

——खरंच कुसुम ! काय वाटेल, ग, तुला ? तुला भरून आल्यासारखं होईल; कुणाला कधींहि सांगतां येणार नाहींत अशा भावऊर्मि तुझ्या हृदयांत हेलावतील; हळूहळू कमळाची एकेक पाकळी उमलूं लागेल—

काहीं क्षणांपूर्वी ओले झालेले तुझे डोळे हंसूं लागतील. पावसाची सर ओसरून गेल्यावर कोंवळी तिरीप पडावी आणि पानांपानांवर थबकून राहिलेल्या थेंबांतून किरणांचा खेळ सुरू व्हावा. त्यांतलेंच तुझें हंसणें !!

—कुसुम ! देवानें त्यावेळीं मला नेमकें तिथें आणून उभें केलें तर ?

———पण तूं तिथें कुठली बसायला फार वेळ ! आपल्या आनंदांत कुणाला तरी वांटेकरी करून घ्यावयाला तूं पाखराच्या गतीनें उडून जाशील आणि साऱ्या घरभर भिरभिरशील !!

नागपूर, १३-८-३५

— १ —

# पिं ज रा

"....and it is a better incentive–" मला तिनें तें वाक्य पुरतें वाचूं देखील दिलें नाहीं. एकदम माझ्या गळ्याला विळखा घालून ती मला घुसळूं लागली. माझाच उलट पापा घेतला तिनें. ही कशाची लाडीगोडी आहे हें मी संवयीनें तत्काळ ओळखलें. —"बापू! पांच वाजलेत् रे—" तिनें माझी कानउघाडणी केली. सायंकाळचे पांच वाजले तरी मी मूर्ख वाचीतच बसलों, हा तिच्या नजरेंत अर्थ भरलेला होता.

फूल! तें जोंपर्यंत फूल असतें, जोंपर्यंत चुरगळलेलें नसतें, चुरडलेलें नसतें, सुकलेलें नसतें तोंपर्यंत त्याचा सारखा सुगंध सुरू असतो. अगदीं दिवसभर त्याचा परिमळ लुटा. पण कुठला येतो इतका सुगंध कळत नाहीं. जणुं सांठाच सांठविला नाजुकशा परागाच्या पोटांत–!! मुलांचेंहि तसेंच! सदा फुललेलीं– सदा सुगंधी!!

कुसुमचें जग वेगळें– माझें वेगळें! माझ्या जगांत कुसुम मिसळूं शकत होती. मला तें साधणें शक्य नव्हतें!

"हं, आज कुठं जायचं बाईसाहेब ?—" मीं टोपी घालीत विचारलें.

"आज ताराताईच्या गौरीला फुलं आणायचीं—" हें तिचें उत्तर. मीं बाहेर येणारे केंस टोपींत दडपले व तिला घेऊन निघालों.

पावसानें फुललेलीं बागेंतील हिरवींगार झाडें; जाईच्या झाडांवरून वाहत येणाऱ्या सुगंधी वायुलहरी—सारें वातावरण उतास आलेलें जणुं! कोंवळ्या गवताची मिरास तर विचारायलाच नको. उगीच वाटे, सारें अंग उघडें ठेऊन त्या गवतावर मनसोक्त लोळावें, ते कोंवळे कोंवळे, पिंवळे हिरवे अंकुर अंगांत खूप खूप रुतवून घ्यावे आणि आपलें सारें अंग पुलकित करावें!

कुसुम तर एकाद्या फुलपांखरासारखी उडत होती. ते तिचे भुरभुरणारे केस आणि फडफडणारा गुलाबी झगा,—कुणालाहि सुवासा वाटला असता फुलांचा!!

मी उगीचच संथपणें फिरत होतों. कुसुम माझ्या समोर समोर पळत होती.

एका पिंजऱ्यांत एक वाघ होता; दुसरा पिंजरा सिंहाचा; तिसऱ्यांत अस्वल, तर चौथा वानरांचा. हा प्राणिसंग्रह करण्याचा उद्देश काय हें मला माहित नव्हतें, पण मौज वाटत होती यांत संशय नाहीं. तो सिंह बिचारा स्वस्थ डोळे मिटून पडलेला. त्याचें तें साधें सात्त्विक स्वरूप जंगलांत कधींच पाहव-

यास मिळालें नसतें. मोठी क्रूर जात, अत्यंत शूर, कधींच स्वतः-कडे पाहूं द्यावयाची नाहीं. माझ्यासारख्या शहरवासीयाला कलेच्या दृष्टीनें त्याचें हेंच स्वरूप जास्त आवडलें! आणि त्याकरितां जीव धोक्यांत घालावा लागला नाहीं!

कुसुमचें सारें मन रमलें तिच्या जातींत! पक्षांचा पिंजरा किती सुंदर तयार केला होता! नाजुक आणि बारिक लोखंडी जाळी; आंत सुंदर झोंपाळे. झाडांच्या मोठ्या कुंड्या, पाण्याचीं टांकीं, चुरचुरीत लाल वाळू. साऱ्या सोयी होत्या. निरनिराळ्या रंगाचे पक्षी; पांढरे गुबगुबीत ससे; गुलहौशी पोपटमैना; आपल्याच ऐटींत मिरविणारा मोर; कधीं मनांत आल्यावांचून पिसारा उचलायचा नाहीं! तो पिंजरा या सर्वांमुळें अगदीं फुलल्या-सारखा दिसे.

एका उंच झोंपाळ्यावर पांढऱ्या शुभ्र रंगाचे दोन पक्षी स्वस्थ बसले होते. पाण्याच्या त्या लहानशा टांक्यावर भोंवतालीं बसून कांठाशीं हेलावणारें पाणी पंखांनीं आपल्या अंगावर शिंपडून घेण्यांत कित्येक गुंतले होते; कांहीं दाणे टिपत उडत असत, तर कित्येकांना उगीच किलबिलत उडण्यांत मौज वाटत होती!

मी कवि नव्हतों, त्यामुळें त्यांच्या आवाजांतील ध्वन्यर्थ मला नीट आकलन करतां आला नाहीं. इतरांपेक्षां माझ्यांत सहृदयता कमीच. कारण त्यांच्या सौंदर्याकडे, मनोहर विलासाकडे पाहत असतांना त्यांच्या पिंजऱ्यांतील असहाय परतंत्रतेबद्दल माझ्या

मनांत मुळींच विचार आला नाहीं. कुसुमसारखा मी पण हौसेनेंच पाहत होतों.

एक लहानसें पांखरूं इकडे तिकडे उडत होतें. तें उडलें, उडलें आणि जाळीच्या तारांत पाय अडकून स्वस्थ बसलें. कशानें तरी किंचित् खरचटल्यामुळें तिथले एकदोन तार तुटले होते. आणि जाळींत एक मोठें छिद्र पडलें होतें. आणखी चारपांच तार वांकविले असते तर सहज त्याची सुटका झाली असती.

त्याच्या मनांत तोच विचार आला असावा. त्यानें आपली चिमणी चोंच त्या तुटलेल्या तुकड्याला भिडविली. आणि पंख उंच करून सारी शक्ति खर्च केली. बराच वेळ त्याचा प्रयत्न चालला होता.

तें तिथून उडालें. एका दुसऱ्या पक्षाच्या कानांत कांहींतरी कुजबुजून त्याला घेऊन आलें. दोघांचा प्रयत्न सुरू झाला. मला जिज्ञासा वाटूं लागली.

मला वाटतें दोघांचाहि प्रयत्न अपुरा पडला असावा. त्या दोघांनीं एक भरारी मारली आणि त्या उंच झोंपाळ्यावर बसलेल्या पांखराकडे धांव घेतली. तिघेहि कायसें चिलबिललीं. परतलीं मात्र दोघेंच! पांढऱ्या गुबगुबीत पक्षानें झोका घेतला व वर पाहत साद घातली.

बदकांच्या तिथेंहि तोच प्रकार. त्यांनीं तर पाण्यांत पाय हल-

वून त्यांच्याकडे पाठच फिरविली. त्याचा मार्ग त्यांना अशक्य वाटला असावा. कबुतराला वाटलें, कुठें आपली सुंदर (?) चोंच खराब होते. ससा तर आपल्याच गडबडींत दिसला; स्वतःच्या बिळाला वाळूंतून तिसरें तोंड काढतां येईल कीं काय याचा विचार करण्यांतच त्याची शक्ति खर्च होत होती. मोर काय; जाणून बुजून कलेचीच प्रतिमा—एकादें पंख झडलें तर सौंदर्यहानी—नुक-सान ! कुणीच मदत केली नाहीं.

तीं पांखरें परत आलीं. एकदां आणखी त्यांनीं पंख फडफड केले. आणि आपल्या चोंची त्या तारांशीं भिडविल्या. अगदीं पंख हलवून हलवून—जणुं त्या लोखंडी तारांशीं विलास चालला होता त्यांचा ! फुलपांखरूं जसें फुलाशीं बिलगलेलें—जशी माता आपल्या मुलाला कवटाळून बसलेली !!

कुणाच्या मर्मावर खबरहि नव्हती. सारे पक्षी त्यांच्याकडे पाहून कांहींसें ओरड होते. तेसुद्धां त्यांना कांहींतरी प्रत्युत्तर देत होते. " नाहीं, आम्ही करीत आहोंत तेंच बरोबर "—हाच त्यांचा मतलब दिसला.

मलाहि जरा कसेंसेंच वाटलें. नाजूक पांखरें बिचारीं ! काय करणार होतीं बाहेर पळून, कांहीं कळत नाहीं. जन्मापासून उंच भराऱ्या मारायची संवय नाहीं. बाहेर सुटका झाली तरीहि एकाद्या फांदीवर बसतील चिंवचिंवत—मारील एकादा पारधी पटकन्

तीर–पडतील मग खालीं !! त्या सुंदर पंखांची नासाडी ! ती चोंच, तो गुबगुबीतपणा–सारें व्यर्थ !!

इतरांनींहि त्यांना हेंच सांगितलें असावें. त्यांनीं पुनः एकदां मोठ्यानें कलरव केला. पुनः त्यांनीं प्रत्युत्तर दिलें–" नाहीं हेंच चांगलें "—

" यू " " यू "—कुसुमचा आवाज तो. मी वळून पाहिलें. फुलपांखरांमागें लागून कुसुम दूर पळाली होती आणि गुलाबाच्या नाजूक कलमांत फुलासारखी दिसत होती.

एकदम मोठा गोंगाट झाला. माझें लक्ष वेधलें. दाण्याची टोपली घेऊन धनी आला. सार्‍या पक्षांनीं भराभर खालीं उड्या घेतल्या. जाळीवर थाप मारून त्या पांखरांनाहि धन्यानें आंत दडपलें व त्या तारा नीट जुळविल्या.

सारे पक्षी चोंची भरून भरून दाणे नेत होते. तीं पांखरें मात्र थकून गेलीं होतीं. त्यांच्यांत त्राण उरलें नव्हतें. एका कोपर्‍यांत दोघांनींहि आपले पंख पसरवून डोळे लाविले. श्वासोच्छ्वासाबरोबर हलणारीं पोटाजवळचीं पांढरीं पिसेंच काय तीं त्यांच्यांतील जीवंतपणाची साक्ष देत होतीं. पडले होते बिचारे स्वस्थ—! बाकीचे पक्षी हंसत होते– किंचित् उपहास– थोडी आढ्यता...

" बापू, ताराताई आली रे,–" कुसुमनें टाळ्या वाजविल्या. तारा फुलांची परडी हातीं धरून येत होती.

" काय, ग ! मी तर आणणारच होतों फुलं—"

" नको, दुसऱ्यांनीं दिलेलीं नकोत कांहीं ! माझ्या गौरीला मींच आणलेलीं फुलं आवडतात—"

तिच्याहि बोलण्यांत बराच गर्भितार्थ दिसला मला त्या वेळीं ! !

ता. २४-८-३४



— २ —

# कुसुमची पहिली लघुकथा

"ही एवढी गोष्ट पूर्ण करून देना रे!"–कुसुमनें माझ्या हातीं एक वही दिली. "मला कांहींतरी strike होतें, पण तें express करतां येत नाहीं." तिनें स्पष्टीकरण केलें.

"Strike आणि Express! मला इंग्रजी येत नाहीं कुसुम!" मीं उपरोधानें पाहिलें.

"नंतर शिकवीन मी पाहिजे तर, बरं बेटा! पण आधीं तें वाच कसा."–आपली लघुकथा कुणी वाचीत असलें म्हणजे आपल्याला तेथें उभें राहणें कसेसेंच वाटतें. कुसुम जावयाला निघाली.

"अहो बाईसाहेब! लाजूं नका–तरी बरं, अर्धीच सोडली आहे गोष्ट!–"

"तुझी काळजी होती कीं मला." ती माझ्या खुर्चीच्या पाठीवर रेलून माझ्या गळ्याला विळखा घालून उभी राहिली. मी तिची गोष्ट वाचूं लागलों........

"एक होती वाघीण"–मी दचकलों. कुसुम वाघिणीच्या गोष्टी

लिहिते ? आणि या वयांत ?? तिच्या ओंठावरला कोंवळा फेंसाळ-पणा जाऊन ती आतां कमळासारखी मोहक दिसूं लागली होती. पिकून फुटून गेलेल्या डाळिंबांत आणि तिच्या उमललेल्या गुलाबी ओठांतून किंचित् दिसणाऱ्या कुंदकळ्यांत कांहींच फरक नव्हता. आणि ही म्हणे वाघिणीच्या गोष्टी लिहिणार –!!

" अग पोरी ! ही काय बुद्धि सुचलीय तुला ? हें वाघिणीचें दूध कशाला आणतेस या घरांत ? तुझ्यासारख्या पोरीनं या वयांत चंद्राच्या, चांदण्याच्या नि वसंताच्या........"

" बापू ! पुरे ना ! तूंच सांगितली होतीस मला ही गोष्ट, मग आतां कां ? नाहीं का वाचून द्यायची तेवढी तुझ्या मनांत ?"– ती शांतपणें म्हणाली. ती चिडली असती तर मलाहि तिला चिडवावयास हुरूप वाटला असता.

मीं सांगितलेली गोष्ट असलीच तर ती पांच-सहा वर्षां-पूर्वीची – म्हणजे ती ज्यावेळीं मीं गोष्ट सांगितल्याशिवाय माझ्या जवळून उठत नसे तेव्हांची.–आणि या गोष्टीवरून ती काय लिहिणार याची मला कल्पना होईना. मी पुढें वाचूं लागलों.

" एक होती वाघीण. ती जरी क्रूर होती तरी आपल्या पिलांना फार जपत असे. तिची आपल्या दोनीहि बच्चांवर सारखीच माया होती.

वाघ आणि वाघीण दोघेंहि शिकारीला गेलीं म्हणजे हीं दोनीहि पिलें त्या गुहेंत एकमेकांना चिटकून पडून राहत. त्या अंधारांत

त्यांच्या डोळ्यांचा इवलासा प्रकाश ठिणगीसारखा दिसत असे. अंगावरचे काळे पट्टेहि नीटसे भरले नव्हते. त्यांचें अंग मऊ-मऊ आणि सोन्यासारखें पिंवळें जर्द होतें. तीं इतकीं लोभस दिसत कीं त्यांना उचलून पोटाशीं धरावेंसें वाटे.

पहांटे वाघ आणि वाघीण परत येत असत. पाणी पिऊन पोट भरल्यामुळें तीं दोघें स्वस्थ डोळे मिटून पडलीं असलीं म्हणजे ते बच्चे त्यांच्या अंगांवर खेळत असत. त्यांच्या त्या नाजुकशा इकडून-तिकडे उड्या सुरू झाल्या कीं वाघ त्यांना आपल्या पंजानें कुरवाळीत असे, पण त्यांचीं नखें अगदीं आंत ओढलेलीं—असलाच तर दुर्वांकुरांसारखा सुखदच स्पर्श असेल त्यांचा फार तर ! त्या क्रूर हिंस्र आणि रानटी श्वापदांचें तें सांसारिक जीवन कितीतरी सुखाचें होतें. त्यांच्या जगांत ज्या गोष्टी येत त्यांपैकीं त्यांना कांहींहि कमी नव्हतें ! !

पण त्यांचे हे सुखाचे दिवस फार लवकर संपले. आपल्याप्रमाणेंच त्यांनाहि दैव असावें. तीं पिलें आतां थोडीं-थोडीं हिंडूं फिरूं लागलीं होतीं. आमची छोटी विमल चालतां येऊं लागल्यापासून जशी सरळ सडकेपर्यंत जाऊन येते तशींच तीं पिलें क्वचित् आपल्या गुहेच्या बाहेर येऊनहि बागडत असत.

एक दिवस त्या जंगलांत शिकारी आले. वाघ आणि वाघीण रात्रीं भटकावयास बाहेर पडलीं होतीं. वाघाला शिकार गवसल्याबरोबर तो तिच्या मागें धावूं लागला; तोंच बंदुकीचा आवाज

होऊन त्याच्या पोटांत गोळी घुसली. पुनः तो संतापून उसळतो न उसळतो तोंच दुसऱ्या गोळीनें त्याचा प्राण घेतला.

वाघीण चिडून गेली; आणि सूडाच्या भरानें तिनें आरोळी ठोकली. पण करणार काय ? तिच्याहि मागच्या पायाला एक गोळी चाटून गेल्याबरोबर तिनें पळ काढला.

—आणि गुहेंत येऊन पाहते तों काय ! तेथें एकच बच्चा ! ! बाहेर येऊन खेळत असलेल्या पिलाला शिकाऱ्यांनीं पकडलें असावें व गुहेंत जाण्याची त्यांची हिंमत न झाल्यामुळें आंतील बच्चा राहिला असावा.

हा सर्व प्रकार पाहून वाघीण अतिशय चिडली व तिनें इतकी भयंकर आरोळी ठोकली कीं त्या अरण्यांतील सारी चराचर सृष्टि भेदरून गेली. पक्षी तर झाडांवर जागे होऊन ओरडूं लागले. वाघिणीनें त्या टापूंत थैमान घातलें, पण तिचा मुलगा सांपडला नाहीं.......

आतां मातेचें सारें प्रेम एकाच मुलावर. त्याच्या भोंवतीं तिचा सारा जीव गोळा व्हावयाचा. ती त्याची काळजी घेई, पण त्याच्या-वर तिनें फाजील प्रेम करणें सोडून दिलें. त्याला दूध न पाजतां कोंवळ्या वयांत तिनें शिकार शिकविली आणि रात्रीं देखील ती त्याला स्वतः बरोबर नेत असे. वाघाचाच बच्चा तो ! कितीतरी लवकर तयार झाला. थोड्याच दिवसांत तो स्वतःची शिकार स्वतःच मारून खाऊं लागला.

ऐन दुपारीं गुहेच्या अंधाऱ्या कोंपऱ्यांत स्वस्थ पडलेली वाघीण आपल्या मुलाकडे मोठ्या अभिमानानें पाही. तिला आपल्या प्रमाणेंच विचारशक्ति असावी ! तिला काय विचार सुचत नकळे; पण ती त्या पिलाला पंजानें जवळ ओढून त्याच्यावर नजर रोंखून बसे. त्याच्या तोंडाजवळ आपलें तोंड नेई. आणि असें रोज रोज ! ! जनावरांना बोलावयाचें असल्यास तीं अशींच बसतात असें मीं कुठेंसें वाचलें होतें. ती वाघीणहि त्याच्याशीं बोलत असावी. जणुं ती त्याला सांगत होती– 'बाळ ! तुला चांगलं पराक्रमी व्हायला पाहिजे. तुझ्या बापाचा वध करणारा शिकारी अजूनहि आपल्या मागावर आहे. तूं त्याचा सूड घेतल्याशिवाय मला समाधान मिळायचं नाहीं. आपल्या जातीची आणि रक्ताची आठवण विसरूं नकोस.–'

वाघिणीनें तोंड फिरविल्यावर तो बावचळल्यासारखें करून गुर-गुरूं लागे. त्याला तिचें बोलणें समजलेंच जणुं ! !"....

...इथें कुसुमची अर्धी गोष्ट संपली. ती पूर्ण करण्याचें काम माझें होतें. काय असेल तें असो पण वाचून झाल्यावर मीं कुसुम-कडे अभिमानानें पाहिलें. तिच्याभोंवतीं माझ्या कांहीं विशिष्ट आशांचें वलय उत्पन्न झाल्याचा मला भास झाला. आणि तिनें देखील ओल्या नजरेनें मला त्याची जाणीव करून दिली.

"मग देतोस का तेवढी पूर्ण करून ?" त्या स्निग्ध शांततेंत तिचे ते शब्द पिंगळ्याच्या चिलबिलाटासारखे वाटले मला !

## कुसुमची पहिली लघुकथा

"खरंच तुझ्याइतकं चांगलं लिहितां यायचं नाहीं मला कुसुम ! पण तुझ्या इच्छेप्रमाणें मी लिहून देतों तुला." आणि मीं लिहावयास सुरवातहि केली.—

"शिकाऱ्याच्या घरीं लोखंडी पिंजऱ्यांत एक वाघाचा बच्चा गजांना पाठ टेंकून पडला होता. सूर्याचा प्रकाश सहन न झाल्यामुळें त्यानें डोळे किलकिले केले होते. आई नसलेल्या अर्भकासारखी त्याची स्थिति झाली होती. दिवसांमासीं तो वाढत होता, पण पंजाचा उपयोग अंग खाजविण्यापेक्षां दुसरा कांहीं आहे याची त्याला फारशी जाणीव नसावी; आणि तसा त्याच्या अंगांत उत्साहहि नव्हता.

शिकाऱ्याची बायको एका भांड्यांत मांस घेऊन तिथें आली. शिकारी अंगणांत उभा होता. एक तुकडा उचलून त्या पिंजऱ्यांत ती टाकणार तोंच शिकारी ओरडून म्हणाला–'अग ! तो तुकडा रक्तांत माखला आहे. कितीतरी रक्त आहे त्याला अजून. पुसून आण सारं तें मांस. एकदां रक्त मिळालं कीं उद्यां तुझ्या व माझ्या नरडीचा घोंट घ्यायला कमी करावयाचा नाहीं तो. त्याच्या जातीची आठवण होऊं देऊं नकोस त्याला. त्याच्यावर पैसे मिळवायचे आहेत–'

नवऱ्याच्या सांगण्याप्रमाणें तें मांस घेऊन ती आंत गेली. इतक्यांत त्याला कसलीशी आठवण होऊन तोहि आंत गेला.

बाहेर आला तेव्हां नुकताच करून आणलेला लांकडी फुटबॉल होता त्याच्या हातांत. त्यानें कुलूप उघडून तो पिंजऱ्यांत टाकला. आणि त्या वाघाला खेळ शिकवावयास सुरवात केली.

—रक्ताची जाणीव आणि जातीची आठवण असलेला जंगलाचा राजपुत्र वनचरांशीं खेळ खेळून त्यांचा फडशा पाडीत होता व इकडे त्याचाच भाऊ चेंडूला आपल्या पंजानें जवळ ओढीत होता ....किती अंतर ! किती फरक ! !

*　　　*　　　*

कांहीं दिवसांनंतरची गोष्ट. शिकारी अजूनहि त्या बच्चाच्या मागें होताच. दिवसें-दिवस त्याला मारणें जड होऊं लागलें होतें. एकदां दोघांची अगदीं समोरासमोर गांठ पडली. आपल्या कलेंत निष्णात असलेल्या शिकाऱ्यानें एकदम गोळी झाडली; पण दुर्दैवानें नेम चुकल्यामुळें वाघानें त्याच्यावर झडप घालून त्याच्या नरडीचा घोंट घेतला.

त्या शिकाऱ्याची बायको एकटीच घरीं होती. तिची सर्वच बाजूंनीं विचित्र परिस्थिति झाली. शेवटीं दुपारची भ्रांत पडूं लागल्यावर तिनें तो पिंजरा वाघासहित विकून टाकला व आलेल्या पैशांवर ती आपले दिवस काढूं लागली.

एक भाऊ! आणि दुसरा भाऊ!!"

मीं टांक खालीं ठेवला न ठेवला तोंच कुसुमनें माझ्यापुढचे कागद ओढून घेतले. टपलेलीच होती ती माझी गोष्ट पुरी केव्हां होते हें पाहत!

ता. १०-२-३५

---

— ३ —

# प्रत्येकानें सांगितलेली गोष्ट

" त्यांनीं सर्व कांहीं केलं, पण अरेरे!—"

ह्या ठिकाणीं प्रत्येकजण थांबायचा आणि किंचित् खिन्न दृष्टीनें शून्याकडे पाहत सांगायचा—" अगदीं थोडा वेळ बरं, तो जायला व घरानें पेट घ्यायला एकच गांठ पडली – गेले बिचारे!!— '

मला मोठें आश्चर्य वाटायचें. प्रत्येकजण काय मला सांगतोय हें! आणि सांगतांना किती उत्साह! कंटाळा नाहींच मुळीं!! स्वतःच्या मुलाचें लग्न सुखानें पार पडल्यावर आईबाप ज्या-प्रमाणें सर्व खुलवून सांगतात – त्याच, अगदीं त्याच अभिनिवेशानें सर्व सांगावयाचें; व मौज अशी कीं, मलाहि त्याचा कधीं कंटाळा आला नाहीं. प्रत्येक वेळीं जो तो आपापल्या परीनें कसें सांगतो हेंच ऐकावेंसें वाटे. प्रत्येकाचा प्रश्न होता—" काय साहेब, गांव पाहायला आलांत ना? मग इथला 'आशा महाल' पाहिलात् कीं— ? "—

—आणि तो " आशा महाल – " म्हणजे.... .... !!!

*　　　　*　　　　*

दादा त्या गांवीं गेल्यापासून एकदां तरी तेथें येण्याबद्दल सुशीलेनें मला दहादां लिहिलें होतें; तेथील जंगल एकदां मी पाहवा हाच तिचा आग्रह; व मी तेथें पोंचतों न पोंचतों तोंच आल्या दिवशीं ती मला पाहवयाला चलायचा आग्रह करूं लागली. कांहीं झालें तरी त्या पोरीच्या हळुवार मनाला मीं एका शब्दानेंहि कधीं दुखविलें नव्हतें.

सुशीला खरेंच धीट बनली होती. धीट म्हणजे 'अगबाई' अर्थानें नाहीं म्हणत मी! धीट म्हणजे अशी कीं जंगली मुलुख पाहून दादांनीं एक साडेचारशेंचा नवीन घोडा घेतला होता, त्याला ती सहज घामाघूम करून आणीत असे.

दुपारीं दोन वाजतां मी, सुशीला व वसंत असे तिघे निघालों. आमच्या गोष्टींना धरबंधच नसल्यामुळें आम्हांला रस्ता कंटाळ-वाणा वाटला नाहीं. शिवाय जंगल खरेंच पाहण्यासारखा होता. सुशीलेनें पत्रांत जें लिहिलें तें खोटें नव्हतें. त्या जंगलांत एकहि जागा अशी नव्हती कीं जेथें कांहीं पाहण्यासारखें नसेल. ज्या ठिकाणीं कांहींच नाहीं तेथें निदान सुंदरशी झाडी व फुलवेलाची गुंफा तरी सांपडेलच!

जवळ जवळ दोन तास आम्ही सारखे भटकत होतों. रस्ता

सुशीलेच्या पायाखालचा दिसला. तिथें पुतळेच पुतळे, पण किती तरी ! मात्र सर्व मोडके, छिन्नविच्छिन्न झालेले ! पडायला झालेल्या एका देवळांतील बुद्धाची मूर्ति कमालीची सुंदर होती. दगडांनीं बांधलेलीं सुंदर सुंदर दुमजली मंदिरें पडून गेलीं होतीं व सर्वत्र बुजबुजाट होऊन रान माजलें होतें. मध्येंच एखादी पाऊलवाट दिसायची. पुढें कांहीं दिसेल या आशेनें चालू लागलें कीं सरळ रस्ता वाघाच्या गुहेंत ! आणि ती गुहा म्हणजे तरी काय ?— पहाडांत खोदलेलें व सुंदर कोरलेलें असें एखादें कुंड असावयाचें व त्याचे आसपासच कुठेंतरी अंधाऱ्या कोपऱ्यांत स्वारी दिवसभर घोरत पडलेली असावयाची.

पूर्वी तेथें कोणत्यातरी राजाची राजधानी असावी. आतां सर्व स्मृतिशेष होऊन जंगलांत लपून बसलें होतें. जंगलाच्या पोटांत शिरल्यावर कांहीं निराळेंच वाटायचें. मनुष्यवस्तींत जें कधीं वाटत नाहीं तें ! वर निळें-पांढरें आकाश व खालीं हिरवी-काळी वनराई ! आकाशांत हजारों वर्षांपासून चांदण्या लुकलुकतात— इथे ते पुतळे, तीं घरें, ते स्तूप,—सारे अज्ञात आणि अनंत काला-पासून पडले होते. चांदणीच्या मंद प्रकाशानें कष्टाळू वाटसरू आपला मार्ग काढतो; कुणी सांगावें, एखादा संशोधक त्या स्मृति-शेषांपासून त्या कालाचा आणि त्या सम्राटाचा पत्ता लावील !! खालीं विस्तीर्ण अरण्य, वर अनंत आकाश आणि त्या भव्य-दिव्य वातावरणांत उभीं असलेलीं आम्ही तिघें !!—निदान दहा

मिनिटेंपर्यंत नीट पाहून घेतल्याशिवाय ही कल्पना चांगलीशी आकलन होत नसे.

वसंत थकून जाईल म्हणून आम्ही परत फिरलों. तो खरोखरीच थकून गेला होता. परत वाटेवर अर्ध्यांतच त्याला तहान लागली. मला तेथेंच उभा करून सुशीला त्याला पाणी पाजायला निघून गेली. दादाबरोबर ती फिरली असल्यामुळें तिला जंगलाची खडान्‌खडा माहिती होती.

मी जेथें उभा राहिलों तेथेंच मला एक पडकेंसें बांधकाम दिसलें. जवळ जाऊन पाहतों तों काय !—तीं कांहीं कोरीव लेणीं नव्हतीं. तो एक बंगला होता– मात्र कोसळलेला ! खिडक्यांचे कांच देखील होते—पण फुटलेले ! ! वरचा भाग काळा दिसत होता व वरच्या मजल्याचें सर्व सामान खालीं आंत कोसळल्यामुळें मध्यें जावयाची सोय नव्हती. फक्त चार भिंती तेवढ्या नीट दिसत होत्या; आजुबाजूला कांहीं दगडधोंडे अस्ताव्यस्त इतस्ततः पडले होते.......

" हाच तो 'आशा–महाल' बरं, बापू "–मागून येणाऱ्या सुशीलेनें मला माहिती दिली. मला आश्चर्य वाटलें. पडका, मोडका असा हा 'आशा–महाल' म्हणजे काय प्रकरण आहे ? मी तिला विस्मयानेंच विचारलें, " काय ग सुशे ! हा किती वर्षांपूर्वी बांधलेला आहे ! यांतलं सामान नी बांधणी अगदीं हल्लींचीं दिसताहेत पण ! "

“ हल्लींचीं म्हणजे वीस एक वर्षांपूर्वींचीं—” तिनं सुरू केलें. “ अरे, तुला माहित नाहीं का ? नुसती स्वतःकरितां ठेवलेली शिकार मारली म्हणून रामलालला गोळी घालून ठार मारणारा तो ××× होता ना ?—”

“ बरं मग ? त्याचं काय ? ”

“ त्याचं असं कीं, तो या प्रांतावर होता कांहीं दिवस. इतका जुलमी होता म्हणतात तो कीं, जंगलाचा राजासुद्धां त्याचे पुढें फिक्का वाटावा. माणसांना गिळायचंच बाकी ठेवलं होतं त्यानं ! ! एकतर लोकांचं स्वातंत्र्य अन् त्याबरोबरच स्वास्थ्य गेलं याच्या येण्यानं आणि दुसरं म्हणजे त्याच्या चैनीसाठीं घरादाराची केव्हां राखरांगोळी होईल याची शाश्वति राहिली नाहीं. सारे हवालदिल झाले बापडे ! शिवाय त्याच्यापुढें कुणाचा इलाज चालावयाचा नाहीं तो नाहींच. कोठें कुणाची दाद लागावी, पण याच्या तर्फेनेंच. कसं शक्य होतं तें ? सर्व कांहीं त्याच्या हातांत आणि त्याचे हात हे असे रक्तानें माखलेले. लोकांची निराशा पेटून गेली. पण करतात काय बिचारे—”

ती किंचित् थांबली, आणि हळूहळू सांगूं लागली— “ शेवटीं एकदां असं झालं; त्यानें शिकारीसाठीं हा बंगला इथं बांधला. येथून तो पशूंची शिकार करीत असे व माणसांची सुद्धां बरं का ? तो असाच तिथं राहायला आलेला पाहून आमच्या

गांवच्या दोन तरुणांनीं मनाचा धडा केला व आपला बेत पार पाडायची त्यांनीं तयारी केली.

"त्यांनीं असं ठरविलं कीं, अंधाऱ्या रात्रीं येऊन अगोदर हा बंगला पेटवायचा; आग लावल्यावर सशस्त्र पहारेवाले भेदरून इकडे तिकडे करतील व तो ***सुद्धां घाबरून बाहेर येईल. तो तसा बेसावध बाहेर येतांच त्याचा खून पाडायचा; मग आपलं काय व्हायचं तें होवो ! पण अरेरे ! !"

पुनः सुशीलेनें तो उद्गार काढिला. "त्यांनीं घर पेटविलं त्याच रात्रीं तो निकडीच्या कामाकरितां आपले लोक वगैरे ठेऊन तसा एकटाच निघून गेला होता. आणीबाणीची वेळ अशी फुकट गेली. झालं ! लागलीच त्यांना पाहारेवाल्यांनीं पकडून त्यांच्या मुसक्या बांधल्या. तेवढ्या वेळांत ते कायसे म्हणाले मला आठवत नाहीं. पण ते त्यांचे शेवटचेच शब्द—!

"ते दोघे तसे गेले याबद्दल लोकांना नाहीं मोठंसं वाटलं. पण ध्वनीला प्रतिध्वनि मिळाला त्यांतच त्यांना आनंद ! लोकांची प्रवृत्ति अशी बनते जुलमानें ! ! तूं कुठंहि जा. या गांवांत तुला प्रत्येकजण ही गोष्ट अभिमानानें फुलवून सांगेल—"

—आणि तसा अनुभव मला दोन दिवसांतच आला. जो जो मला भेटला त्यानें त्यानें मला सांगितलें. सिगारेटस् घ्यायला मी पानवाल्याकडे गेलों. वास्तविक त्यांची मनोवृत्ति कशी

असते याची प्रत्येकाला कल्पना आहे. पण मी सिगारेट पेटत्रीत असतांनाच तो म्हणाला,—" साहेब, आपल्यासारखे येतात तेव्हांच सिग्रेटचा खप; नाहींतर इथें सर्व खाकीच चालते. पण गांव पाहायला येऊन 'आशा—,"

" होय, पाहिला कीं—" मी त्याला उत्तर दिलें.

" तें विसरणें शक्यच नाहीं. कुणीतरी सांगितलंच असेल, " तो बोलूं लागला. त्यानें ती गोष्ट पुन्हां मला सांगितली. 'साहेब, पोरं पण पोरं होतीं तीं ! ! अगदीं राम—लक्ष्मणाची जोडीच समजा. कोंवळीं तर अशीं कीं नरडा दाबून प्राण घेतला असता तर रक्ताऐवजीं दूध ओकलीं असतीं. गरीब, सालस ! पण अंगाची आग झाल्यावर काय सुचतं सांगा बरं ! ! त्यांचा काका याच ××× च्या रागाला उगीच बळी पडला. असा मर्द गडी होता म्हणून सांगूं ! अन् त्याचेच हे बच्चे—सिंहासारखे व कोंवळे, तरुण—"

त्याचा आवाज बदलला. नेहमींचा रंगेलपणा त्याच्या तोंडावरून नाहींसा झाला. आपुलकीच्या भावनांनीं त्याचे डोळे लहानमोठे होऊं लागले. तो अभिमानानें म्हणाला,—" पण हें मर्दाचें काम बरं ! त्याची मदार वयावर नसते—मनगटावर ! ! जिच्या पोटीं आले त्या माऊलीची कूस सोन्याची झाली......"

मी परतलों. तिथल्या टवाळांच्या अड्ड्यांतहि त्या राम-

लक्ष्मणांची मानसपूजा सुरू आहे तर—!!! माझ्या मनांत विचार सुरू होते.......

काल जें पाहवयाचें राहिलें तें आज पाहवयाचें म्हणून मी व सुशीला निघालों. अर्ध्या वाटेवर 'त्या आशा–महाला' कडे माझी नजर गेली. मी उगीचच थांबलों.

दोन–चार गांवकरी जंगलांतून परत येत होते. तेहि तसेच थबकले. आजूबाजूला चारदोन बांधकामाचे दगड पडले होते ते त्यांनीं उचलून पुनः त्या चार भिंतीच्या चौकटींत टाकले व थोडा वेळ थांबून ते चालते झाले. ती आठवण तशीच राहवी, किंबहुना त्या पडक्या, निरुपयोगी, जंगलांत एका बाजूला दडलेल्या पण त्यांच्या दृष्टीनें त्या भंगलेल्या मंदिराची एक फुटकी कांचदेखील गमावूं नये हीच त्यांची मनीषा!!!—

भावविवश होऊन मीं देखील तिथें पडलेला कांचेचा तुकडा उचलून आंत टाकला; व कधींकाळीं मोडक्यातोडक्या भाषांतरांत बसविलेल्या ओळी गुणगुणूं लागलों:–

' थडग्यावरी रिकाम्या, कुणी दीप ठेवितांना ? " त्या अफाट वातावरणांत सारखे पडसाद उठत होते. पण त्यांत माझे शब्द विलीन झाले असें मला वाटलेंच नाहीं.

ता. १–११–३८

— ४ —

# वि ही र

त्या विहिरीला वरून तोंडी नव्हती. चार धोंडे नीट बसवून तिची बांधण गोल व नीटनेटकी केली होती. भोंवतालीं सारा चिखल माजला होता व त्यांतच ठेवलेल्या दगडावरून पलीकडे विहिरीवर जावयाची वाट !

बऱ्याच जणी पाणी भरीत होत्या. चाक नसलेली विहीर ती. पाणी ओढायचें झालेंच तर वांकून ओढणें फक्त शक्य.

प्रत्येकीच्या लुगड्याचा रंग निरनिराळा होता. पिंवळा, खडी काढून रंगविलेला काळा, लालवट—पुष्कळ पुष्कळ रंग होते. पाणी ओढतांना त्या खालीं वांकत आणि त्या विहिरीची तोंडी झांकली जाई. दुरून पाहणाऱ्याला वाटे—जणुं रंगीबेरंगी फुलांफळांनीं लवलवलेल्या वेलींची चिरणच !!

मातीच्या घागरी दोरानें आंत टाकून त्या पाणी ओढीत होत्या. बांधणीच्या गोट्याला लागून घागर केव्हां फुटेल याचा नेम नव्हता. फार जपत होत्या त्या ! घागर भरून आल्यावरच त्या इकडे तिकडे पाहत !!

# विहीर

" यशोदे, हा हात उघडा कसा ग ? आज सकाळीं तर होत्या साऱ्या बांगड्या, " एकीनें भीत भीत प्रश्न केला. यशोदेचा चेहरा सुकला होता; डोळे लाल झाले होते; व नेहमींपेक्षां ती कमी बोलत होती.

तिच्या जवळ असलेल्या गिरजेनें कपाळावरचे केंस बाजूला सारले व स्निग्ध दृष्टीनें तिच्याकडे पाहून तोच प्रश्न विचारला. तिला उत्तर देणें भाग होतें. तिच्या कपाळीं किंचितशी आंठी पडली ! तिनें ओठ थोडेसे आंत ओढले !–

" फोडल्या बाई तुझ्या भावानं. "

" कोण, राजाराम का ग ?—"

' पण, तुझ्या नवऱ्यानं कांहींच म्हटलं नाहीं ? ' तिसरीनें आश्चर्यानें विचारलें. त्या स्पष्टस्पष्ट बोलत होत्या !

" ते तरी काय म्हणतील ग नेहमीं ? उलटीं मलाच बोलणीं बसलीं. जेवायच्या वेळेस चटणीचं नांव काढलं म्हणून घाईघाई वाटायला बसलें. तुझ्या भावानं मीठ मागितलें. घाईंत मला ऐकूंच आलं नाहीं. त्याला आला राग आणि ताट आपटून तो उठून गेला–वाटी माझ्या हातावरच पडली. "

" एकेक उलटंच ! अन् तुझ्या घरीं सारं सहन केलं अं ! " यशोदेच्या डोळ्याला थेंब आले होते.

"तो तरी काय करील बिचारा !" गंगू घागरीचा गळफास सोडीत म्हणाली. "म्हातारी असेल जवळच. बोलून उगीच शोभा. चौघांच्या घरीं बोलतां येत नाहीं. होय, त्याला उदंड वाटलं तसं, पण तो यशोदेलाच बोलेल सारं गिळून. चौघांचं घर ! बिचारीला—"

सर्व बायका तटस्थ होऊन सहानुभूतीनें तिच्याकडे पाहत होत्या. तिनें डोळ्याला पदर लावला होता. व न आठवण्याचा प्रयत्न करूनहि, मागचें तें सारें आठवून तिला एकदम हुंदका आला !

"उगी, उगी बेटा !" नुकत्याच आलेल्या वयस्क स्त्रीनें तिच्या पाठीवरून हात फिरविला. दोन गोड शब्द बोलल्यामुळें यशोदेला गहिंवर आला होता.

"उगी बेटा, हें कसलं मेलं चौघांचं घर !"

"नाहीं तर काय ग ?" यशोदा एकदम बोलूं लागली. तिचें अवसान तिच्या डोळ्यांतून साऱ्यांकडे पाहत होतें.—

'उगी, उगी तरी किती वेळ राहूं ? अशी लाही होते जीवाची. सासू बोलते ती वेगळी. दीराचा प्रकार हा असा. पुनः ते बोल-तील वेगळेंच—त्यांना समजून उगीच डोळ्यांवर कातडं–आणि मलाच बोलणीं. जीव जातो सदा. एकादे दिवशीं—"

" हं, असं भलते जागीं बोलूं नये. भर, पाणी भर, ती–पहा, घागर गोळ्याशीं हेलकावते आहे–"

" रोजचंच झालं तर..."

ती घागर तिनें तोलून धरली आणि तशाच जड हातानें वर ओढली. बाकीच्या साऱ्याजणी भारावलेल्या अंतःकरणानें पाणी काढीत होत्या–!! कुणीच बोलत नव्हतें.

दुरून पाहणाऱ्यांना वाटे–फुलाफळांनीं लवलवलेल्या निरनिराळ्या वेलींची चिरण आहे ती एक—

पण किंचित् जवळ गेल्यावर कळलें असतें–कुणाचेहि जीव घ्यायला सोकावलेली, तोंडी न बांधलेली अशी ती एक काळ्या दगडाची विहीर आहे आड दडलेली—

आणि........!!

—पण तिच्यांतूनहि त्या बिचाऱ्या खोल खोल घागरी टाकून जपून जपून जीवन ओढताहेत!!

ता. २९.–४–३४.

— ५ —

# मानव्याच्या दिशा

मी नदीवर पोंचलों, तेव्हां चांगली पहांट झाली होती. वातावरण उमललें होतें; प्रवाहाची खळखळ अविरत सुरू होती; पांखरांचे थवे चिवचिवत होते.

मी शीळ घालीत कितीतरी वेळ उभा होतों. थोड्याच वेळांत बाजूच्या टेकडीवरील सूर्यबिंब स्पष्ट दिसूं लागलें. सारी सृष्टि तेजाळली, किरणें पाण्यावर नाचूं लागलीं.

मी खिशांतला चाकू काढला व दांत धुण्याकरितां बाभुळीची काडी तोडावयास गेलों. कांटा बोचूं नये म्हणून मी जपून जपून फांद्या ओढीत होतों. फांदी दोन बोटांच्या चिमटींत धरून मीं जोरानें चाकू मारला; परंतु तो चुकून माझ्या करांगुलीला लागून भळभळ रक्त वाहूं लागलें. माझा जीव कासावीस झाला. तात्पुरता करण्यासारखा असा कोणताच इलाज नव्हता. मी जोरानें बोट दाबून धरलें व नदींत वाळूवर येऊन बसलों.

"बेंऽऽ—" माझ्या मागून आवाज ऐकूं आला. मी वळून पाहिलें. एक मनुष्य दोन मेंढरांना धरून येत होता. आला

तसाच तो पाण्यांत शिरला, व त्यानें त्या दोनीहि मेंढरांना पाण्यांत लोटलें. तीं बिचारीं ओरडूं लागलीं !

बोट कापल्यामुळें मी अस्वस्थ होतोंच, त्यांत त्यांच्या केविलवाण्या ओरडण्याची भर पडली. मला एकदम मागचा प्रसंग आठवला—

त्या दिवशीं देखील याच वेळीं मी वाळूंत बसलों होतों. एक मध्यम वयाचा शेतकरी एका मेंढराला घेऊन त्या नदीवर आला आणि असेंच त्याला त्यानें पाण्यांत लोटलें. मी सारखा पाहत होतों.

त्या मेंढरांच्या अंगावरची मऊमऊ लोंकर भिजून गेली होती. त्यानें त्याला सावकाश धुतलें; नंतर वाहेर काढून अंगावरच्या वस्त्रानें त्याचें अंग पुसून काढलें. थोडा वेळ उन्हांत राहिल्यावर त्या मेंढराचें ओरडणें बंद झालें, व तें चालूं लागलें. तो त्याच्या मागून जात होता—

त्या बारीक वाळूंत मेंढराचीं पावलें उमटत होतीं व मागून चाललेल्या माणसांच्या पावलांनीं पुसट्न जात होतीं. कसेंसेंच वाटलें मला ! !

घराजवळ येतांच रामजीनें त्या मेंढराचें दावें धरलें; व अंगणांत उभ्या असलेल्या आपल्या मुलाच्या हातीं देऊन तो घरांत गेला. अंगणांत एका बाजूला वाजंत्री बसले होते. दुसरी-

कडे चारदोन शेजारी जमून लवकर चालण्याविषयीं रामजीला घाई करीत होते. काय चाललें आहे याचा मला उलगडा होईना. इतक्यांत रामजी घराबाहेर आला. त्याची एक मूठ कुंकवानें भरली होती; व दुसऱ्या हातीं मुळापासून तोडलेलें मोराचें पंख होतें. त्यानें तें कुंकू मेंढराच्या कपाळीं लावलें व गळ्याचें दावें तोडून तें पंख बांधलें. वाजंत्र्यांना वाद्यें वाजवावयास सांगून तो पुनः आंत गेला.

थोड्या वेळानें अगदीं शुचिर्भूत होऊन तो आला. त्यानें पूजेचें तबक आपल्या हातीं धरलें होतें. कणकेच्या दिव्यांत तेलवाती तेवत होत्या. ती पंचारती त्या मेंढराला ओंवाळली गेली. मरणापूर्वीचें त्याचें हें वैभव पाहून माझ्या पोटांत धस्स झालें.

कुंकवाचा दोन बोटांचा टिळा रामजीनें आपल्या कपाळीं लावला; व सौभाग्यवतीला हांक मारली. ती आंतून बाहेर आली. तिनें पिवळें वस्त्र परिधान केलें होतें. तिच्या खांद्यावर एक चार वर्षांचें मूल होतें. त्याच्या अंगावर मळकें पांघरूण असल्यामुळें त्याच्या डोक्यावरचें चिटाचें नवें टोपरेंच तेवढें दिसत होतें.

पुढें वाजंत्री, मध्यें तें मेंढरूं, त्याच्यामागून रामजी, रामजीची बायको अशीं सर्व मिळून सुमारें वीसएक जणांची ती मिरवणूक निघाली. त्या बिचाऱ्या मेंढराला कल्पना असेल का ? त्याला आज चांगले गहूं खावयास मिळाले होते. त्याचें सर्वांग स्वच्छ धुतलें

गेलें होतें; व तें आपल्याच नादांत डुलतडुलत अगदीं 'इतश्च इतश्च' चाललें होतें ! !

—पुनः मला दिसलें...त्या मेंढराचीं गोल गोल, छोटीं छोटीं खुरें जमिनीवर उमटत होतीं व रामजीच्या पावलांनीं पुसून जात होतीं. मला भीति वाटली त्या एकंदर प्रकाराची ! !

एका ओबडधोबड देवळाजवळ ती मिरवणूक थांबली. त्या देवळाला कडूलिंबाच्या डहाळ्यांनीं शोभा आणली होती. एक लाकडी त्रिशूळ तेथें गाडला होता व त्याला शेंदूर फांसला होता. दाराच्या पायरीवर कोंबडींचीं पिलें चिवचिवत होतीं.

आंत जगन्माता देवी दगडाचें रूप घेऊन व सर्वांगाला शेंदूर फांसून बसली होती. तिच्या डोळ्यावरहि शेंदूर फांसल्यामुळें तिच्या भक्तांचा हा सोहळा तिला दिसणें शक्य नव्हतें ! !

रामजी, त्याची बायको, मुलगा वगैरे थोडीशी मंडळी आंत गेल्यावर देवीची पूजा करण्यांत आली. तिला दहींभात अर्पण केला गेला; तिच्यावर फुलें उधळण्यांत आलीं. खणानारळानें तिची ओटी भरण्यांत आली. उदाचा एक प्रकारचा उग्र वास सुरू झाला.

पायरीवर फिरणाऱ्या पिलांपैकीं एक देवीला अर्पण केलें गेलें; आणि येथपर्यंत सारें यथास्थित झाल्यावर रामजीची नजर त्या मेंढराकडे गेली. तें बिचारें डोळे मिटून स्वस्थ उभें होतें.

तो उग्र वास त्याला सहन झाला नाहीं म्हणा, किंवा, त्या देवाच्या कृपेनें त्याला मरणाआधीं मरणाचें ज्ञान झालें म्हणून म्हणा, पण त्यानें अत्यंत केंविलवाण्या स्वरांत टाहो फोडला.

रामजीनें त्याला देवीजवळ उभें केलें. देवीला बळी देण्याचें भाग्य नशिबीं आल्यामुळें त्या बिचाऱ्याचा देह सत्कार्यीं खर्चला जाणार होता ! मान कापल्यावर रक्ताची धार देवीच्या शिरावर पडेल अशा रीतीनें त्याला रामजीनें उभें केलें; व अत्यंत भक्तिभावानें देवीची प्रार्थना केली—" माय माझे देवीमाय ! चुकलं माकलं पोटांत घाल; हें लेकरूं तुझंच आहे. चांगलं वागूं दे. भुताखेतांपासून राखणारी तूंच आहेस. तुझ्या ' निवेदकोला ' हा बळी देतों. संतुष्ट होऊन सुखी ठेव—"

रामजीच्या बायकोनेंहि असाच नमस्कार केला. व त्या आजारी असलेल्या मुलाच्या कपाळीं देवीचा अंगारा लाविला. सर्वांनीं नमस्कार केल्यावर एक सुरा घेऊन रामजी उठला. त्यानें तो कचकन् मेंढराच्या मानेवर मारला. तें बापुडवाणें ओरडत होतें. पण त्याचेकडे कुणाचें लक्ष जाणार ! ! अडीच घाव मारल्यावर रक्ताची धार देवीच्या शिरावर गळूं लागली.

—एक अत्यंत हृदयभेदक टाहो आणि तें बिचारें धडापासून वेगळें झालें. त्याचें शीर देवीच्या पुढ्यांत पडलें. देवीनें निर्माण केलेला एक जीव देवीच्या नैवेद्याकरितां देवीला दिला गेला. देणारा कोण ? देवीनें निर्माण केलेला मानव....रामजी ! !

रामजीचा चेहरा आनंदी झाला. आतां त्याच्या मुलाची रोगराई पळून जाणार होती. तो सुखी होणार होता. देवी त्याच्यावर संतुष्ट होणार होती. देवीच्या नैवेद्याची आज शेजाऱ्यांना मेजवानी—रामजी मोठा देवभक्त ठरला होता ! !

ती मिरवणूक परत निघाली. पंचारतीचें रिकामें ताट मुलाच्या हातांत होतें. त्या मेंढराचें धड रामजीच्या हातांत असून त्यांतून रक्त ठिबकत होतें. आणखी एकदां माझें लक्ष गेलें—ज्या जमिनीवर थोड्या वेळापूर्वी मेंढराचे खूर उमटत होते त्याच जमिनीवर आतां त्याच मेंढराचें रक्त टपकत होतें. रामजीचींहि पावलें तशींच उमटत पण मागून येणाऱ्या लोकांच्या पावलांत मिसळून जात ! ! !

*　　　*　　　*

नदीवरच्या त्या दोन मेंढरांना पाहून माझ्या डोळ्यांसमोर वरील प्रसंग येऊन गेला. तो मनुष्य अजूनहि त्यांना धूतच होता. माझ्या बोटाचें रक्त आतां थांबलें होतें.

बिचाऱ्यांना मारायचेंच झालें तर उगीच धुणें वगैरे कशाला ? ? —मला संताप आला. या माणसाचा नवस मोठा दिसतो; कारण दोन मेंढरांना हा बळी देणार ! ! मी त्याला कांहींतरी म्हणणार होतों इतक्यांत त्यानें दोनीहि मेंढरांना बाहेर आणिलें. पुनः मला वाटलें, आतां हा त्यांना त्या बोथट सुरीनें...! ! भेदरल्या दृष्टीनें

त्याच्या त्या प्रत्येक कृतीकडे मी पहात होतों. तो आपल्याच कामांत गुंतला होता.

त्यांच्या अंगावरची पांढरी शुभ्र लोकर भिजून गेली होती. त्यानें त्यांचें अंग पुसून काढलें व घराकडे निघाला. त्याचें घर फार दूर नव्हतें. अंगणांत शिरल्याबरोबर त्यानें बायकोला हांक मारली; व एक मोठें घोंगडें मागून घेतलें. अंगणांत कुणीच नव्हतें. त्यानें तें ऐसपैस आंथरलें. व त्यावर त्या दोनीहि मेंढरांना बसवून तो आंत गेला. आतां पंचारती येईल. नंतर एका आजारी मुलाला घेऊन त्याची बायको बाहेर निघेल...

....पण बाहेर कुणीच निघालें नाहीं. तो घरांतच कांहींतरी बोलत होताः—

"काय ग, भाकर झाली का ?"

"अहं—"

"किती वेळ आहे ?"

"एक घंटा, बरोबर रोजदार वेळीं ताट आणून देईन मी."

'मी घरींच आहें आज. भाकर झाली कीं हांक मार मला —" तो बाहेर आला. तीं मेंढरें डोळे मिटून स्वस्थ ऊन खात बसलीं होतीं.

तो सावकाश त्यांच्याजवळ गेला. त्यांपैकीं एकाला त्यानें उठवून आपल्या मांडीवर घेतलें व अत्यंत प्रेमानें पोटाशीं धरलें....

" एवढें प्रेम आहे तर बळी घेतो कशाला बिचाऱ्यांचा, " मी स्वतःशींच आश्चर्यानें – कांहींशा तिरस्कारानें उद्गारलों.

त्यानें त्याच्या तोंडावर हात फिरविला, पाठीवर थाप मारली. ती त्याच्या अंगावरची लोंकर पूर्णपणें वाळली किंवा नाहीं, हें अंगांत हात खुपसून पाहिलें; ती वाळली होती. तो सरसावून बसला. त्यानें आपल्या लांब खिशांतून एक कात्री काढली व त्या मेंढराची लोंकर कापावयास सुरवात केली.

तो आपल्याच कामांत निमग्न होता. त्याचेंहि मुख सतेज होतें, आनंदी होतें, हंसरें होतें.—

पण त्याच्यासमोर शेंदूर फांसलेली व रक्तानें न्हाऊं घातलेली देवी नव्हती.—

—उलट अत्यंत शुभ्र, स्वच्छ, विपुल लोंकरीचा ढीग पडला होता व देवीनें निर्माण केलेले दोन जीव एकमेकांच्या गरजा भागवीत होते ! ! !

ता. ७–१२–३४

---

— ६ —

# मातीचीं भांडीं

गोंडाची जात ती! तिचें नांव काशी आणि तिच्या आईचें नांव लक्ष्मी. त्यांचा सर्व व्यवहार त्यांच्या गोंडी भाषेंतच चाले. क्वचित् त्यांना मराठी किंवा हिंदीहि बोलावें लागे आणि तें काम चारपांच भाषांचें मिश्रण करून त्या करून टाकीत असत.

दिवसांतून एकदां तरी त्यांना शेजारच्या गावांत जावें लागे. शिवारांत कष्टाची किंमत असली तरी त्याचा मोबदला गावांतच मिळतो. त्या दोघीहि जंगलांतील वस्तू गोळा करून गावांत विकत असत. कुठें एकादवेळीं मधाचें पोळें सांपडे; तर कधीं एकादा पोपट हातीं येई; कधीं सशाचें पांढरें गुबगुबीत पिलूं त्या घेऊन जात, तर केव्हां केव्हां तित्तूरच विकावें लागे. पांचसात पैसे हातीं येतील त्याचे अधोली तीनशेर जोंधळे घेऊन त्या घरीं येत असत.

पोट दोघींचेंच, पण त्याकरितां त्यांना दिवसभर शिवशिवारांत व दरीजंगलांत हिंडावें लागे. जगांत एका चंद्रमोळी खोपट्याशिवाय त्यांच्या मालकीचें असें कांहींच नव्हतें; ना जमीनीची एक चिरोटी

कीं एक फुटकी कवडी. चारदोन पैसे आले कीं त्यांतच आदले दिवशींचे एकदोन टाकून दिवस परतवावा लागे—

—पण त्यांचा जीवनक्रम त्यांच्या जातीच्या मानानें सुखाचा चालला होता. संध्याकाळ झाली कीं लक्ष्मीच्या झाडल्यासारख लेल्या अंगणांत चारदोन गोंड जमत, तेव्हां एकंदर परिस्थितीचें आकलन होत असे. एका हातानें चिलमेवर टेंभुर्णीचा पाचोळा ठेवीत आणि दुसऱ्यानें चकमक झाडीत एकादा वयस्क तिला म्हणे–"माय, सुकानं साडितिन्ता। भागवान् हाय" (लक्ष्मी, सुखाची भाकर खातेस बाई, भाग्यवान् आहेस). स्वतःच्या तुलनेनें पाहत असे बिचारा तो. चार पोरें देवानें कंबरेला बांधलीं, त्यांच्या ओझ्यानें त्याला फरफटत चालावें लागे. पायांत कांटा बोचला तर धडपणें काढतां येत नसे, मग विसावा घेण्याचें दूरच!—

लक्ष्मीची झोपडी होती खुट्मुट्टुच, पण कमालीची स्वच्छ होती. शेणाकरितां पैसे खर्च करावे लागत नाहींत व परमेश्वर गरिबांना जे हात देतो ते कष्टाकरितांच. सकाळीं कमाविलेलें संध्याकाळीं संपून जात असल्यामुळें पसारा देखील घरांत नव्हता.

पंधरासोळाच्या आसपास असलेली तिची मुलगी काशी अगदीं पहिल्या नव्हाळीनें फळास आलेल्या उंबरीच्या झाडासारखी पिंवळी आणि रसरशीत दिसत होती. उन्हातान्हांत व

काव्यांगोव्यांत हिंडतांना तिचें तोंड गेंदासारखें गरगरून येई व त्यावेळीं ती उंबराच्या फळासारखी लालसुरंग भासे. तिचा कमरे-पर्यंतचा खालचा भाग गोंधलेला होता. गोंधणें ही त्यांच्या धार्मिक समजुतीची बाब. गोंधल्याशिवाय त्यांच्या जातींत लग्नाला परवानगी नाहीं. काशी किंचित् दोनचार वर्षांची झाल्याबरोबरच हा विधि करण्यांत आला होता. त्यावेळीं एकदोन कुरूप बाया एकत्र जमल्या. आणि काशीला पालथी घालून तोंडानें ' कुचकुच ' असे विचित्र शब्द उच्चारीत व खूप मोठ्यानें गाणीं म्हणत त्यांनीं तिच्या कमरेखालचा भाग सुयांनीं टोचून काढला. त्या रंगीबेरंगी नक्षीकामानें काशी त्यांच्या दृष्टीनें अधिक सुंदर दिसूं लागली होती. काशीचा पोटऱ्यापर्यंतचा भाग गोंधलेला असल्यामुळें तित्तुराच्या पंखासारखा चित्रविचित्र दिसे; पण त्या गोंधण्याच्या विधीची आठवण झाली म्हणजे तें सारें भयंकर वाटे.

जंगलांत जाऊन मोळी आणण्याचें काम खरेंच कठिण असतें. वरवर पाहत राहून हिरव्या झाडाची वाळलेली फांदी तोडावयाची, कुठें काटक्याकुटक्या गोळा करावयाच्या व मोळी बांधून आणा-वयाची, यांतच काशीचा दिवस मोडत असे. शिवाय लक्ष्मी आतां थकलेली असल्यामुळें दोघींचेंहि काम तीच करी.

दुसरे दिवशीं इतर गोंडिणीबरोबर काशीहि गांवांत मोळी घेऊन जाई. त्या वेळीं लोक तिच्या जांभळासारख्या टपोर डोळ्यां-कडे डोळे मोडून पाहत असत. रस्त्यानें जाणाऱ्या त्या बायकांना

मोळीचा भाव विचारतांनाहि अश्लील कोट्या करून दांत काढावयास ते कमी करीत नसत. गरिबांकडे कसेंहि पाहण्याचा व त्यांच्याशीं कसेंहि वागण्याचा लोकांना हक्कच असतो! उलटपक्षीं रोजरोज मुडदे पाहणाऱ्या डोंबाला त्यांत विलक्षण असें कांहीं वाटत नाहीं!!

चारदोन गोंडिणी एकत्र असल्यावर त्यांच्या वाटेस जाणें म्हणजे मारक्या म्हशींना चिडविणें होय. परंतु हें खरें असलें तरी मोळी विकत घेणाऱ्यांच्या घरीं त्यांना बिचाऱ्यांना एकेकटेंच जाणें भाग पडे. कुठें एकाद्या बाईला जास्त उशीर लागला कीं दुसऱ्या बाया लागलीच समजत कीं तिच्या 'बटव्यां' त मोळीच्या किंमतीपेक्षां जास्त पैसे आहेत. आणि ह्या गोष्टीचें त्यांच्यापैकीं कुणालाहि कधीं आश्चर्य वाटलें नाहीं. असा प्रसंग प्रत्येकीवर बहुधा कधींतरी येत असेच. त्यांतून ज्या सुटल्याबचावल्या त्या भाग्यवान् आणि बाकीच्या बिचाऱ्या....!! पण त्यांना "बिचाऱ्या" असें म्हणणेंच मुळीं चूक! आणि दुसरें असें कीं पैशाचा लोभ कुणाला सुटला आहे? आपल्या मुलाला रंगीबेरंगी आंगड्याटोपऱ्यांत पाहण्याची त्यांना इच्छा होत नसेल का? त्या एकमेकींना समजून असत, व त्यामुळें ह्या गोष्टी त्यांच्यापलीकडे फारशा पसरत नसत.

काशीचा निका ती तेरा चवदा वर्षांची असतांनाच ठरला होता. पण तिचा नवरा लग्न व्हावयाचे अगोदरच झाडावरून

पडून मेल्यामुळें तें तितकेंच राहिलें. मध्यंतरीं बापाला वाघाची शिकार भोंवली व तो देखील दगावला. घरचा आसरा तर गेलाच, पण मर्तिकाचे चारदोन पैसे देणें झालें होतें, तें देतांना काशीच्या लग्नाचा प्रश्न लांबला.

काशी या बाबतींत काय बोलणार ! दिवसभर काम करून थकल्यावर रात्रीं झाडलेल्या जमिनीवर एकदां पडली कीं तिला दिवस निघत असे. शिवाय तिच्यांत एक प्रकारची उदासीनता बाणली होती. दिसावयाला ती भरलेली व लवचिक दिसे, पण असें दिसणेंहि गरिबींत देणगी नसून एक आपत्ति असते. या सौंदर्यामुळें तिच्याबद्दलची इतर बायकांची सहानभूति नाहींशी झाली होती. आणि लोकांच्या त्रासाला गरिबीमुळें आळा घालणें अशक्य झालें होतें. ती बिचारी पाण्यांत राहूनहि इतर मासळ्यांची वैरीण झाली होती.

एकदां काशी एकटीच मोळी विकून मुक्यामुक्यानें घरीं आली. तिची चर्या करपलेली दिसत होती व तिचें सर्व अंग मोडल्यासारखें होऊन पासोळ्या ढिल्या पडल्या होत्या. घरीं येऊन पोंचते न पोंचते तोंच तिच्या मागोमाग बायका आल्या; व लक्ष्मीला बातमी कळली. काशी मोळी पोंचवायला गेली होती. त्या घरांत किती लोकांशीं तिची गांठ पडली हें मात्र काशीलाच बिचारीला माहित. पण तिचें ऐकतो कोण त्या वेळीं........ ? ? काशी सोळा वर्षांची होती.

लक्ष्मीला कळत नव्हतें असें नाहीं किंवा असा प्रसंग गरिबांना नवखा नसतो हें तिला माहित नव्हतें असेंहि पण नव्हे. परंतु यावेळीं तिचीच चवली खोटी झाली. तिनें आज गावांत न जातां काशीला एकटें पाठवावयाची चूक केली होती. इतरांसमोर ती काशीला नाहीं नाहीं तें बोलली. तिलाहि राग आला होता. पण बायका जातांच ती शांत झाली. तिनें काशीकडे पाहिलें. रानबोरासारखी टपोर पोरगी आज सुकलेली पाहून तिला भडभडून आलें व–" काशी, मातीचं भांडं दुसऱ्याला कसं गवसूं दिलंस बया, माणसांचं काय ! तांब्याचं भांडं नेहमींच खणखण आवाज देतं– त्याला दोष नाहीं. पुनः आपली जात पडली ही अशी...." काशीनें आईच्या कुशींत मान खुपसली व डोळे मिटून ती स्वस्थ पडली. मधून मधून लक्ष्मीच्या बाहूचा आंतला भाग ओला चिंब होत होता.

लक्ष्मीला जी मूळ भीति पडली होती ती जातीबाहेर पडण्याची; आणि ती खरी होती. आज साऱ्या जातींत ही गोष्ट कळणार. त्यांतल्या त्यांत चारदोन जणांनीं आपल्या मुलाकरितां काशीबद्दल मागणी घातली होती ती तिच्या बापानें नाकारली होती. मग काय; त्यांना एकप्रकारें आनंदच झाला ह्या गोष्टीनें !

बिचारी लक्ष्मी शेवटीं जातपंचाच्या हातापायां पडली आणि काशीला शुद्ध करून घ्यावयाची तिनें गळ घातली. त्यांना आपला

अधिकार गाजवावयास मिळाल्यामुळें त्यांनीं दुसरे दिवशीं काशीला त्यांच्या रिवाजाप्रमाणें शुद्ध करून घेण्याचें कबूल केलें.

इकडे काशी बापुडवाणी होऊन झोपडींत पडली होती. आणि आश्चर्य हें कीं इतर मोळीवाल्या बायकाहि तिला घालून पाडून बोलत होत्या. जणूं कांहीं ह्यांच्या अंगीं ह्यापैकींच कांहींच नाहीं ! लक्ष्मी झोपडींत येतांच तिनें शुद्धीची हकीगत सांगितली. त्याबरोबर काशीचें अंग शहारून आलें आणि ती भयभीत होऊन मिरमिर पाहूं लागली !—

—साऱ्या जणी सहीसलामत सुटतात नि आपल्यावरच मात्र हा प्रसंग यावा याचाच तिला अचंबा वाटला. दैवावर हात ठेवण्याची तिला जन्मापासून संवय नसल्यामुळें तिला या सर्व प्रकाराची चीड आली. परंतु उपाय—? ?

दुसरे दिवशीं सकाळीं काशीची आई तिला घेऊन नदीवर गेली. रस्त्यांत तिनें काशीला पुष्कळ धीर देण्याचा प्रयत्न केला, पण काशी एक शब्द बोलली नाहीं. ती संथपणें चालली होती. आली तशीच ती नदीच्या खडकावर उभी राहिली. अजून सूर्योदय झाला नव्हता. काशीची नजर नदीच्या पाण्यावर खिळली होती. पण तेवढ्या अवधींत नदीनें कितीतरी पाणी वाहून नेलें तरी काशीला कळलें नाहीं. ती नुसतीच पाहत राहिली !

थोड्या वेळानें जातपंच एका न्हाव्याला घेऊन तिथें आले.

नंतर एक शिंदीच्या पानोळ्यांची एक झोंपडी करण्यांत येऊन भोंवतीं काटक्याकुटक्या गोळा करण्यांत आल्या.

पंधरासोळा वर्षांची काशी अजूनहि ह्या प्रकाराकडे पाठ करून खडकावर उभी होती. तिला त्यांनीं नेसतें वस्त्र सोडून पाण्यांत उतरण्यास सांगितलें. उतरली बापुडी कशीबशी ! गळाभर पाण्यांत गेल्यावर सूर्याकडे नजर करून तिला त्यांनीं खूप बुचकळ्या खावयास सांगितल्या. चार पांचदां बुडल्यावर ती भांबावून जाऊन किंचित् थांबत असे. ती थांबली न् थांबली कीं लगलीच ते लोक तिला नाहीं नाहीं तें बोलत–" रन रोन बाडी सोडिति तिन्दाले पुट्टिता चोको चोको ! बाहुनकी तेनि आहुन सुदरकीन् " ( गेलीस कशाला दुसऱ्याच्या घरांत ? चांगलं सुख मिळालं, भोग आतां जें केलं तें— )"

—टोचून टोचून त्यांनीं तिची जखम सडवून टाकण्याचा प्रयत्न केला. प्रत्यक्ष प्रकार घडला त्याच्याहि पुढें ते गेले. त्यांच्या रूढींतच सांगितलें होतें तें. अश्लील आणि अभद्र बोलून पतितेची मानहानी केल्याशिवाय तिची शुद्धिच होत नाहीं ही त्यांची प्रामाणिक समजूत !

बराच वेळ पाण्यांत बुडवून काढल्यावर तिला एक लहानसें फडकें नेसावयास देऊन बाहेर बोलाविण्यांत आलें, व ती त्या झोपडींत जाऊन बसली. तिनें कुणाकडेहि पाहिलें नाहीं. लक्ष्मीकडे पाहण्याचें दूरच, पण ती ज्या बाजूला उभी होती तिकडेहि

नजर टाकण्याचा तिला धीर झाला नाहीं. तिच्यांत एक प्रकारची अशरणता बाणली होती.

दोनीहि गुडघ्यावर दंडाची घडी घालून तिनें त्यांत आपली मान खुपसली, व जागेवरचें आपलें लक्ष काढून घेतलें.—

—नंतर ती झोपडी त्यांनीं पेटवून दिली. आंत काशी बसली होती. बाहेरच्या काटक्याकुटक्याहि धडधडून पेटल्या. कुंभाराच्या भट्टीसारखा धूरच धूर झाला सगळीकडे ! !

काशी आंतमध्यें चांगली होरपळून निघाल्यावर तिच्या आईनें तिला झोंपडीबाहेर ओढलें. न्हावी बाहेर तयारच होता. त्यानें पांच रुपये घेऊन तिच्या समोरच्या केसाची बट घेतली व काशी शुद्ध झाली.

पण यावेळीं मात्र ती शुद्धींत नसावी. शिंदीच्या जळत्या पानोळ्या तिच्या पाठीवर पडून पाठ सोलून निघाली होती. व बराच भाग भाजला होता.

—मातीचें भांडें एकदां विटाळलें कीं त्यालाहि असेंच शुद्ध करून घेतात अग्नींतून— ! !

—तिसरे दिवशीं काशी नेहमींप्रमाणें जंगलांत गेली. व तिनें मोळी बांधून आणली. रात्रीं आईच्या कुशींत दडून ती सुखावून झोंपली. पंधरा वर्षांत तिनें बरेंच जग पाहिलें होतें, त्यामुळें ती थकली होती जणुं ! !

—पहांटे मोळी डोक्यावर घेऊन ती एकटीच गावांत गेली. व जी गेली ती परत आलीच नाहीं ! !

बापुडी लक्ष्मी ! तिनें काशीकरितां भाकर करून ठेविली होती. –उन्हातान्हांतून थकलेली काशी आतां मग येईल; येईल... पांखरासारखी तडफड चालली होती तिची ! !....

—जग कामाला लागलें. कुंभारानें आपली भट्टी उकलली, व नव्या कोऱ्या मडक्यांचा बाजार मांडला. जगाचे व्यवहार सुरू झाले.......

ता. ३०-४-३५

— ७ —

# झोंपेंत लिहिलेली गोष्ट

माझ्या केंसांवर व पापण्यावर फुंकर घातल्याचा मला भास झाला. मीं डोळे उघडले. सुशीला नुक्तीच येऊन बसली होती. तिनें हळूच माझा हात आपल्या हातांत घेतला, व किंचित् हंसून माझ्याकडे पाहिलें.

—"मला आतां झोंप लागावयाच्या बेतांत होती. तुला झोंपायचं नाहीं का?—"

—"हं—" एवढाच उद्गार फक्त उत्तरादाखल तिच्याकडून निघाला.

—"आज उदास वाटतंय सुशे तुला? नीज ना;—" मीं तिला जवळ जवळ बळजबरीनेंच निजविली. आणि वाऱ्याचा झोत बंद करावयास खिडकीची पाटी लोटली. सुशी अजून देखील बोलली नव्हती.

—"तुला राग आला का? मी अगोदर झोंपलों म्हणून?" मीं तिला अधीरतेनें विचारलें.

—" तुमचा राग? नका बोलूं असं—" ती माझ्या अंगाला अधिकच घट्ट बिलगली!!

## झोंपेंत लिहिलेली गोष्ट

तिला उदास वाटावयास कांहीं कारण घडलें होतें असें नव्हे. कधींकधीं अकारणच खिन्नता वाटते, यांतलीच सुशीलेची आजची अवस्था. मला मोठेंसें वाटलें नाहीं. तिला बोलती करणें मात्र अवश्य होतें.

—"मी काय केलं म्हणजे तूं बोलशील ?"

—"मला एक गोष्ट सांगा."

—"आणि थापटूनथोपटून निजवा माझ्या सोनीला; लहान आहेस कीं नाहीं आतां—"

—"खरंच सांगा ना !—" तिच्या आवाजांत असहायता भरली होती. "मला आज तुमचं बोलणं ऐकावंसं वाटतंय आणि तें ऐकत असतांनाच झोपावंसं—"

—"सुशे, मी रागवेन अशानं तुझ्यावर ! हें काय ? एकदां खदूखदून हंस बरं ! सांगतों तुला एक गोष्ट, पण तूं हंस एकदां. अगदीं मोतीमाणकं सांडलीं पाहिजेत."

तिला आणखी जवळ घेतांच ती खुदकन हंसली ! व त्यानंतर संथ निळसर पाण्यावर उठणाऱ्या विलोल वलयांसारखें बराच वेळ तिचें अंग हलत राहिलें.

—"आतां सांगा गोष्ट. खूप लांब–मला ऐकतां ऐकतां झोंप लागली पाहिजे. वाटल्यास मग मी अशीच हंसत निजेन !"

—"पण चांदण्यांच्या प्रकाशांत मला झोंप येईल का ?—" सुशीला पुनः एकदां हंसली !

कुठली तरी एक गोष्ट मी तिला सांगावयास सुरवात केली–
"एक होती...."

"हं–"—गोष्ट सुरू झाली.

"एक होती उषा आणि एक होता विशाल. दोघांचं एकमेकांवर साखरलिंबासारखं प्रेम होतं. उषा सुंदर होती आणि विशाल गोड होता. पण त्याचं उषेवर प्रेम असलं तरी त्याला वेगळं कर्तव्यक्षेत्र होतं; आणि त्यांतच त्याचा पतंगासारखा प्राण जाणार हें ठरलेलं होतं; पुढील वियोगाची कल्पना दोघांनाहि आली कीं, ते एकमेकांकडे अगदीं केविलवाण्या नजरेनें पाहत असत. गवसलेल्या घडीचा एक क्षणहि त्यांनीं फुकट घालविला नाहीं.

उषा तारकेसारखी हंसरी, चंचल आणि फुलपांखरासारखी हांवरी होती. विशाल मेघासारखा गंभीर, स्निग्ध आणि पर्वतासारखा निश्चयी होता. दोघें सुखानें राहत होतीं.

पण त्यांचें सुखाचें पांघरूण एक दिवस वाऱ्यावर उडून गेलें, व दोघांनाहि एकमेकांपासून दूर व्हावें लागलें. विशाल निघून जाणार होता आणि तो जीवंत परत येणार किंवा नाहीं याचीहि मोठीशी आशा नव्हती. त्याला निरोप देतांना उषेची स्थिति काय झाली याची कल्पना आहे का तुला ? "

—" बिचारीला आकाशांतून निखळून पडल्यासारखें वाटलें असेल, " सुशीला विरघळून म्हणाली. तिच्या डोळ्यांत दंवबिंदूंचा ओलावा भरला होता. पुनः मी सांगूं लागलों.

—" विशालनें उषेचा निरोप घेतांना तिला आनंदी राहवयास सांगितलें,—" 'उषे, माझ्याकरितां रडायचं नाहीं. झऱ्यासारखं झुळझुळ हंसत रहायचं'—त्याचा स्वर समजावणीचा होता.

' पण खरंच तुम्ही जीवंत परत याल का ? ' उषेनें निराशेनें विचारलें. त्राफेनें मलूल झालेल्या फुलाची एकेक पाकळी गळून पडत होती.

' मी खात्रीनं येईन. आणि मेलों तरीहि तुझ्यापासून फार दूर असायचा नाहीं. माणसं मरत नाहींच मुळीं ! ती जाईची वेल आहे ना ? तिला रोज पाणी घालीत जा. जोंपर्यंत ती हिरवी राहील तोंपर्यंत मीं जीवंत आहें हें निश्चित. तिला फुलं आलीं, कीं समजून जा मी सुखांत आहें आणि आनंदांत हंसतों आहें. '

'पण वेलीला एकदां हात लावून जा,' उषा शरविद्ध साळुंकीसारखी चिवचिवून म्हणाली. विशालनें घट्ट मन करून त्या झाडाला हात लाविला व एक फूल उषेच्या ओठावर ठेवून तो निघाला—

" तीं एकमेकांपासून दूरदूर जात होतीं. त्यांच्या डोळ्यांतील एकमेकांच्या आकृती आंत आंत उतरून हृदयांत स्थिरावत होत्या. "

मला किंचित् थांबावें लागलें. सुशी मुळींच बोलली नाहीं. तिच्या मंद निःश्वासाशिवाय कसलाहि आवाज ऐकूं येत नव्हता. भारावलेल्या अंतःकरणानें मीं गोष्ट पुरी केली.

—" जगांतलीं अर्धी अधिक माणसें चकोरासारखीं आशेवर नि भावनेवर जगत असतात नाहीं ग सुशे ? उषेनें त्या झाडाला नियमित पाणी घालणें सुरू केलें. तें झाड अधिकाधिक हिरवेंगार दिसूं लागलें. उषाहि त्याच्या कळीसारखी उल्हसित राहूं लागली. त्या वेलीला नियमित फुलें येत; पण खरंच विशाल हंसत होता का ?–"

—' होय, खात्रीनें. ' सुशीला मध्येंच म्हणाली.

—"कल्पना आहे तुझी. विशालच्या देहाच्या चिंधड्या उडाल्या होत्या ! पण इकडे उषा मात्र त्या जाईचीं नाजुक फुलें हौसेनेंच तोडून घेत होती. भोळी भावना बिचारीची ! जाई कशाला करपेल पाणी मिळतंय तोंवर—"

—" पण असंच कां म्हणून ? विशाल त्या झाडांत कशावरून येऊन बसला नसेल ? व त्यांच्या सजल सद्भावनांचीं फुलें कशा-वरून फुललीं नसतील ? "

—"तूं सुद्धां उषेसारखीच बोलतेस. अग, झाडांत का कुठं प्राण येतात माणसांचे ? आपल्या कल्पनांचे खेळ ! पण तूं मला अशी बिलगतेस कां ? मी कांहीं तुला सोडून जात नाहीं—"

## झोंपेंत लिहिलेली गोष्ट

—" हं, असं नाहीं बोलायचं. निजा बरं, फार वेळ झाला. कशाला ही गोष्ट सांगितली ?—" आणि तिनें माझ्या डोळ्यांवर हात ठेवून आपले डोळे घट्ट मिटून घेतले.......

.......कां म्हणून तिला मीं ही गोष्ट सांगितली ? सुशीचा उदासपणा घालवावा म्हणून मीं तिला गोष्ट सांगावयास सुरवात केली आणि मलाच उदास वाटलें. आमच्या दोघांच्या भावनांत काय साम्य असेल ? सुशीलेला झोंप लागलेली होती. तिच्या डोळयाच्या कडा अजूनहि ओल्याच होत्या. मी देखील झोंपण्याच्या प्रयत्नास लागलों.

* * *

मी कोणत्या जगांत होतों हें कळलें नाहीं. पण माझ्या पाठीखालीं मऊमऊ हिरवळ होती, व वर अनंत आकाशाची पोकळी ढगानें भरली होती. माझ्यापासून कांहीं अंतरावर एक पांढऱ्या चाफ्याचें झाड होतें व त्याच्याच खालीं पांढरें कायसेंसें दिसत होतें.

कुणाचें तरी थडगें असावें तें ! चार चौकोनी दगडांनीं तें रचल्यासारखें दिसत होतें. त्यांतील मधला दगड किंचित् पांढुरका दिसत होता.

आजूबाजूला पाहिल्यावर मी स्मशानांत असल्याची माझी खात्री झाली. पण इथें इतकी सुंदर, स्वच्छ, मऊशी हिरवळ

कशी उगवली ? स्मशानाबद्दलच्या माझ्या कल्पनेशीं तें सारें विसंगत वाटलें मला. मी माझ्याबरोबर सहज म्हणून आणलेल्या कळ्या त्या पांढऱ्या गोट्यावर ठेविल्या व एकटें आणि निवांत वाटलें म्हणून पुनः बसून राहिलों.

पावसाळा अर्ध्यावर आला होता. श्रावण आणि भाद्रपद महिन्यांतील मधली पंधरा दिवसांची उघाड होती. आकाशांतून ढग बाजूला सरकावयाला लागले होते. त्यांची धांवपळ सुरू होती. दूरदूरचे ढग जवळ जवळ येत आणि एकमेकांत विरून जात. साऱ्या पृथ्वीवर हिरवी सावली पडली होती. फुलपांखराचे पिंवळे पंख इकडे तिकडे फडफडत असत. सर्व प्रदेश जीवनानें मुसमुसून आला होता—आणि तें एक स्मशान होतें ! !

कुठूनशी वाऱ्याची मंद झुळूक आली. स्मशानांत वारा देखील खेळायला येतो. दुसरा झोत आला. झाडावरचीं पांढऱ्या चाफ्याचीं फुलें टपूटप् आवाज करीत त्या थडग्यावर पडलीं. किती नाजुक होता तो आवाज ! झोंपेला आसुसलेल्या वनदेवतेच्या पापण्यांचा सुद्धां मिटतांना इतका नाजुक आवाज होत नसेल ! !

माझ्या कळ्या त्या फुलांनीं झांकून टाकलेल्या मीं पाहिल्या. किंचित् गंमत वाटली मला. वाऱ्याच्या मंद स्पर्शानें सुखावल्यामुळें आकाशांत फिरणाऱ्या घारीकडे दृष्टि लावून सुस्त पडून

राहवेंसें वाटलें मला. त्या अर्धसुप्त स्थितींत मी किती वेळ पडलों असेन कोण जाणे ! !

माझ्या कळ्या त्या पडलेल्या फुलांशीं बोलूं लागल्या. एका कळीनें एका फुलाला विचारलें—“ कसा आलास इथं तूं ?”

—“तूं कशी आलीस तें सांग.”

—“तो पलीकडे माणूस झोंपला आहेना ? त्यानं मला आणलें आपल्याबरोबर. घेतला तंवर वास आणि दिलं मला या दगडावर फेकून. निर्दय– पण तूं कसा आलास तें सांग ना–”

—“अग, आम्ही इथंच राहतों—”

—“पण नेमका ह्याच ठिकाणीं......”

—“हं, हं ! ! ती गोष्ट होय; ती बरीच लांब आहे. काय करायचंय तुला ? ती सांगेपर्यंत तूं सुकूनसुद्धां जाशील.”

—“असं काय करतोस. सांग ना ! एवढ्यांत सांगून सुद्धां झाली असती.”—फुलानें तें कबूल केलें.

—“तुला अगोदर हें सांगावयाचें राहिलें कीं, आपण ज्या दगडावर बसलों आहोंत त्याच्या खालीं एक जीव आहे.

“ जीव ? पण तें थडगं आहे ना ?–” कळीनें मध्येंच विचारलें; तिला आश्चर्य वाटलेंसें दिसलें.

“तूं ऐकून घे. एके दिवशीं एका माणसाला शिडीवर निजवून

इथं आणण्यांत आलं. व एक खड्डा खणून त्यांत त्याला निज-विल्यावर वर हे दगड ठेविले गेले. उद्देश हा कीं, त्यांची झोप कुणीहि मोडूं नये. इथं एक बाई अगदीं नियमानं येत असे. या दगडावर हात ठेऊन ती रोज हे दगड अश्रूंनीं भिजवून टाकी. पण एवढा गाढ निजलेला माणूस नुसतं पाणी शिंपडल्यानं का कुठं जागा होतोय—

—“पुढं त्या बाईनं माझ्या आईला येथें आणून ठेविलं. आणि स्वतः येण्याचं बंद केलं. माझी आई लहानपणापासून इथंच राहूं लागली; तिला कोणीहि पाणी घालीत नसे. परंतु उन्हाचा तिला कधींहि त्रास झाला नाहीं. परवांच तिनं आम्हांला सांगितलं कीं, या दगडाखालीं झोंपलेला जीव तिला सारं पुरवीत असे म्हणून! ती आम्हांला नेहमीं सांगते—‘बाळांनो! तुमचे वडील झोंपले आहेत. खालीं खेळावयास जातांना जपून खेळत चला.’

—“ह्या दगडावर सांपडलेल्या दंवबिंदूंनीं आमच्या वडि-लांची तहान भागते. जोंपर्यंत हे दगड त्या बाईच्या अश्रूंनीं भिजत होते तोंपर्यंत वडिलांना दंवबिंदूंची कधीहि गरज पडली नाहीं. पण आतां मात्र त्याच थेंबावर ते जगतात.

—“माझ्या आईवर त्यांचं खूप प्रेम आहे. तिचे हात नेहमीं जमिनींत त्यांच्या हातीं असतात. आमची आई देखील

त्यांची खूप काळजी घेते. त्यांना वर येण्याची इच्छा होत नाहीं. म्हणून ती रोज आम्हांला त्यांच्याकडे खेळावयास पाठवून देते. आम्हीं निघून गेल्यावर आमचे कपडे येथं पडलेले असतात, ते वाऱ्यानें उडून जातात. आमचे वडील आम्हांला दिसत नाहींत, पण ते आमचा खेळ पाहतात असें आई सांगते—"

" पण येथं तुम्हांला करमतं रे ?" मध्येंच कळीनें प्रश्न केला.

" न करमायला काय झालें ? आम्हांला आमचीं कामें असतात. आम्हीं तुझ्यासारखे कुणाबरोबर उगीच भटकत नाहीं. त्रास होतो आम्हांला. कुणाबरोबर गेलं म्हणजे त्यांना मुके द्यावे लागतात मग."

" तरी देखील एकटं तुम्हांला इथं कसं बरं वाटतं देव जाणे–" कळी आश्चर्यानें उद्गारली.

"अग, पण आम्ही एकटे कुठं आहोंत ? इथल्या प्रत्येक दगडाखालीं कुणीतरी झोंपलेलं आहे. तें बाभळीचं झाड दिसतंय ना तुला ? तिथल्या दगडाखालीं एक मुलगी निजली आहे. ती खदखदां हंसली कीं त्या बाभळीला खूप फुलें येतात. आणि वाऱ्यावर बसून तीं फुलें आमच्याकडे आलीं, कीं आम्हीं खूप खेळतों त्यांच्याशीं."

" त्या मुलीचं हंसणें ऐकूं येतं का तुम्हांला ?"—कळीला खूप जिज्ञासा उत्पन्न झाली होती.

" अहं, आई सांगते—"

" परंतु तुम्हांला इथून कुठंहि जायला मिळत नाहीं–असंच..."

" नको आम्हांला कुठें जायला. उगाच फिरत बसण्यांत काय अर्थ आहे? तूं इथं आमच्यांत आलीस, ती केवळ सुदैवानें! नाहींतर पडली असतीस कुठें एखाद्या गटारांत लोळत आणि रडत! इथं निजायला येणारीं माणसं आपल्याबरोबर फुलं आणतात. तींसुद्धां अशींच आमच्यांत मिसळतात—रमतात! पण त्या फुलांशीं त्यांचे भाईबंददेखील नीट बोलत नाहींत. त्यांना फुटक्या नशिबाचीं म्हणतात. काय कल्पना बिचाऱ्यांना येथील सुखाची! आमच्या हंसण्याफुलण्यानें येथील लोकांची कितीतरी करमणूक होते. शिवाय आम्हांला त्यांच्यापासून त्रास मुळींच नाहीं. तुमच्या तिथं कोण आमचं एवढ्या सुखासुखी कौतुक करणार आहे?–"

" देवा "—कळीला एकदम रडूं कोसळलें. " आम्हांलासुद्धां कशाला पाठविलंस त्या जगांत? आम्हांला लोक घेतात तेव्हां घेतात; आमच्याशीं खेळतात तोंवर खेळतात नि वाटेल तिथं फेंकून देतात. मला जसं इथं पाठविलंस तसंच माझ्या बहिणींनाहि इथंच पाठव. कुणीतरी नवीन माणूस थकूनभागून इथें येईलच. त्याच्याच बरोबर दे पाठवून. म्हणूं दे त्यांना फुटक्या नशिबाची—"

......गारगार वाऱ्यानें माझें अंग शहारून आलें आणि मी डोळे उघडले. त्या कळ्या त्या फुलांत मिसळून गेल्या होत्या.

—फुलानें सांगितलेली हकीकत खरी असेल का? इथें सारे झोंपायलाच येतात का? मग मरण कशाला म्हणायचें, इथल्या माणसांच्या सद्भावनांचीं फुलें होतात का? त्यांच्या आशा–आकांक्षा फळांच्या रूपानें झाडावर डंवरून येतात का?

—त्यांच्या संथ श्वसनानें वारा वाहतो. त्यांचीं सुखदुःखें चांदण्यांत लुकलुकतात, आणि त्यांच्या अंतःकरणाचा ओलावा झाडांना मिळून तीं जगतात. इथें वाईट गोष्टींना थारा नाहीं. यावयाच्या अगोदरच पूर्वीच्या मुक्कामीं ते वाईट गोष्टी ठेऊन देतात. चांगलें तेवढेंच येतें त्यांच्याबरोबर इथें. लोक त्या प्रत्येकाबरोबर म्हणतात—" खरेंच, किती चांगला होता तो?"

—इथलीं झाडें, तीं थडगीं, तें हिरवें–कोंवळें गवत, त्यावर बागडणारीं फुलपांखरें, झाडावर भुरभुरणारे पक्षी,—जगांत तरी आणखी काय असतें? ह्या साऱ्यांत चैतन्य नाहीं असें कोण म्हणेल? मरणाबद्दलच्या भीतिप्रद कल्पनेनें डोळे थिजून मग कदाचित् इथलें तें सारें निर्जीव दिसत असेल. एरवीं तें कसें शक्य आहे?

—इथले दगड धोंडे—त्यांना जीव नाहीं असें वाटतें....... कीं आपल्याला? पण एका देहाचें–त्या देहांतील चिरंतन शक्तीचें, त्याबरोबर विरून गेलेल्या अशा स्निग्ध, शुद्ध, पवित्र आठवणींचें ते रक्षण करीत आहेत. युगानयुगें ते तसेच राह-

तील; पाऊस पडेल तेव्हां ते भिजतील, उन्हाच्या चटक्यानें ते तापतील, थंडीनें गारठून जातील; पण त्यामुळें आंतल्या जीवांना थोडीच दखल पोंचणार आहे? साऱ्या साऱ्या आठवणींना पोटाशीं धरून ते जगताहेत. त्यावर स्मशानांतील फुलें पडताहेत व त्यामुळें ते सुगंधून गेले आहेत. तो सुगंध आंतल्या जीवांना मिळतो व ते सुखावून झोंपतात.

*                    *                    *

मी जागा झालों, तेव्हां सुशीला अर्थशून्य नजरेनें वर पाहत असलेली मला दिसली. सूर्याचीं कोवळीं किरणें खिडकीच्या कांचेंतून आंत आलीं होतीं, व किंचित् धूसर असा प्रकाश पडला होता.

"कसला विचार करतेस ग ?—"

तिनें माझ्याकडे पाहिलें; पण त्या पाहण्यांत उद्देश असा कांहींच नव्हता. ती आपल्याशींच म्हणाली,—"माणसं मरतच नाहींत मुळीं–"

तिलाहि माझ्यासारखेंच स्वप्न पडलें असेल का ? तिच्या आणि माझ्या भावनांत कांहीं साम्य आहे का ? मी तिच्याकडे अगदीं एकसारखा पाहूं लागलों—

मम व्रते ते हृदयं दधामि
मम चित्तमनुचित्तं ते अस्तु ।

## झोंपेत लिहिलेली गोष्ट

मम वाचमेकमना जुषस्व
प्रजापतिष्ट्वा नियुनक्तु मह्यम् ॥

आमचे दोघांचेहि डोळे ओले झाले होते !!

ता. २५-७-३५

---

— ८ —

# रात्रिरेवं व्यरंसीत्

—आणि त्यानंतर ती धडपडून उठलीच ! !

तिच्या त्या नेहमींच्या दगडाखालीं ऊन घसरतांच तिनें धुणीं धुण्याचें बंद केलें. घरांत कांहीं वाजलें म्हणून हातचा पिळा हातींच ठेवून ती आंत आली. मांजरीच्या तोंडांतून ओढलेली अर्धी भाकर तिनें खापराखालीं दाबली व खोलीबाहेर निघून झोंपा लोटला. बाहेर राधा उभी होती तिच्याकडे तिनें पाहिलें व "चला बाई–झालं—" असें म्हणून ती निघाली. अजून आठ वाजले नव्हते. पण आपल्याला उशीर होईल या भीतीनें त्या दोघीहि भराभर पावलें उचलूं लागल्या. चालतांना त्यांच्या हातांतील पांढऱ्या धातूच्या बांगड्यांचा आवाज होत होता.

"राधे, उशीर झाला का ग ?" रंगूनें मिलच्या पोंग्यांतून निघणाऱ्या धुराकडे पाहत विचारलें.

"नाहीं ग ! पण तुला आज अशी घाई कां झाली ? संध्याकाळचं काम करून ठेवलंस वाटतें !—"

" सकाळचंच पडलं आहे गाडाभर ! तुझ्यासारखी सुखी आहें का मी ! सासू आपली तुकडा करून ठेवतेच आहे....

" हं ! सासूचा रंग पाहिला नाहींस म्हणून सुखावलीस वाटतं असं म्हणायला ! बरं, धंदा रोजचाच झाला. हे तुझे डोळे असे लाल कां ?–"

" —काल बिलकुल डोळा कसा —"

" हं ? ? – " राधा मिस्किलपणें हंसली व चुप बसली.

" काय झालं ग हंसायला ? " —किंचित् रागानें रंगूनें तिला डिंवचलें.

"समजायचं तें समजलंच. आतां उगीच हें कशाला ?"

"अग, तसं नाहीं. तुझं आपलं भलतंच बाई नेहमीं."

"माझं आपलं भलतंच आणि तूं जशी वैतागलीस कीं नाहीं ? तसं नाहींतर कसं बाई ? कालची रात्र गूळपोळीसारखी गेली असंच कीं–"

"काय मूर्ख आहेस ग ! ऐकून तर घेशील ! कर्जदार काल दारांत येऊन बसला होता, त्याची समजूत घालतां घालतां रात-पाळीला झाला उशीर व—"

"पण रोज जातो ना तुझा नवरा रात–पहारीवर ?

"हो, पण काल पंचवीस पेटारे जास्त भरायचे होते. अन्

येतां येतां रस्त्यांत तमाशा सुरू होता, तिथें थांबली स्वारी व मग डुलत डुलत दोन वाजतां घरीं आली—"

"आणि मग तुला जागी केली म्हणतेस ?"

"अग, मी जागीच होतें ! मला कशाची झोंप येते आहे तोंपर्यंत...."

बिचारी रंगू भोळ्या भावानें बोलून गेली. पण राधेच्या खट्याळ हंसण्यानें तिला तिची चूक कळून आली, व खरा प्रकार ध्यानीं आला.

"राधे, आज बरंच हंसूं येतंय तुला ! मी नाहीं बोलत जा–"

"अशी काय रागावतेस ग ! गम्मत केली मी—" राधेनें तिचा पदर धरून ठेवला.

"बरं, बरं—मोठी आलीस—"

"नाहीं, मी लहान, उगीच हें कशाला. मला सुद्धां कधीं कधीं झोंप येत नाहीं एकटीला.

—हं, दोन वाजतां आला—??—" तिचा आवाज समजावणीचा होता.

रंगू शेवटच्या वाक्यानें निवळली, व सांगू लागली,—"रात्रीं दोन वाजतां व तोहि तमाशा पाहून आल्यावर तो काय निजूं देतोय मला. जरा थोड्या गप्पागोष्टी होऊन उगीच डोळा

लागला तोंच सकाळचा पोंगा झाला—उठलों बाई दोघेंहि धडपडून !! आणि त्यानंतर...."

मिलच्या दाराजवळ येतांच त्यांनीं एकदम बोलणें बंद केलें. दाराचा शिपाई त्यांच्याकडे पाहत होता. त्या लगबगीनें आंत घुसल्या. आंतली विस्तीर्ण जागा काळीभोर झाली होती. यंत्रांचा 'खर्रर्र खस्' असा विचित्र आवाज होत होता; व बाहेर बसविलेलीं चाकें सारखीं फिरत होतीं. दुतर्फा लावलेल्या मेंदीवर कोळशाचा धुरळा बसल्यामुळें तिचा मूळचा हिरवा रंग आतां काळसर धुरकट झाला होता. कित्येक दिवसांत भरपूर पाणी न मिळाल्यामुळें भुकेल्या माणसानें व्याकुळ होऊन जशी मान टाकावी तशीं तीं झाडें वाऱ्यानें हलत होतीं. व मोठीं झालीं म्हणूनच जगत होतीं जणुं !!

—त्या झाडांच्या आड त्याहि दिसेनाशा झाल्या !!!

ता. १०-४-३४

---

— ९ —

# क ला वि का स

लखूनें नेमका तोच धडा काढला आणि वाचावयास सुरवात केली. " पक्षांचीं घरटीं "—! त्यावेळीं त्याच्या वयांत असतांना मला त्या धड्यांतील स्वारस्य कळत नसे. 'कलेकरितां कला' या तत्त्वाप्रमाणें मी तो धडा वाचावा म्हणूनच वाचीत असें. पण तीच आतां त्यांत किती अवीट गोडी भरली आहे ! ! वाचतां क्षणींच एक निराळें वातावरण डोळ्यांसमोर उभें राहतें—पांखरांची सृष्टि ! !

" आपल्या मादीची मर्जी संभाळण्याकरितां नर काय वाटेल ती खटपट करील. लोंकरीचा एखादा तुकडा मिळविण्याकरितां मेंढ्यांच्या मागोमाग जाईल. कोंबड्याच्या एखाद्या खुराड्याच्या आसपास हिंडून पिसें गोळा करील; व प्रसंगविशेषीं एखाद्या घरांत शिरून त्यांतूनहि लोंकर, रेशीम, कापूस वगैरेवर झांप मारून भुर्रकन् उडून जाण्यास कमी करणार नाहीं...."

"....याप्रमाणें सृष्टीनें अशीं हत्यारें दिलीं असूनहि केवळ अपत्यप्रेमाखातर विलक्षण मेहनत करून व कल्पकता दाखवून पक्षी आपलीं सुंदर घरटीं तयार करितात. "

लखूनें धडा वाचून संपविला. किती काव्यमय जीवन असतें त्यांचें ! आपल्या चिमुकल्या चोंचीनें पक्षी मऊमऊ, इवलेइवले अंकुर आणून देतो आणि पक्षीण घरटें तयार करते ! सर्व नरमगरम वस्तू ती एका कोपऱ्यांत जमविते आणि आपल्या लुसलुशीत, पिसापिसांच्या, गुबगुबीत पोटानें त्या साऱ्या दाबून-दाबून नीट बसविते. पंख पसरून एकदां अंडीं घातल्यावर किती जपते ती त्यांना ! !

सांज पडल्यावर नर आणि मादी अंडीं पंखाखालीं घालून सुखानें चिंवचिंवत झोंपीं जातात आणि पहांटेच्या मंद वाऱ्यावर भुर्कन् उडून जातात. स्वतःच्या अपत्यांकरितां आपली सगळी कलाकुसर खर्च करायची ! त्या कलेंतच त्यांचें जीवन विकास पावतें ! आणि या जीवनांतच त्यांचा कलाविकास होतो.

मीं खोलीच्या खिडकींतून सहज बाहेर पाहिलें. एका मोठ्या पिंपळावर एक घरटें होतें. तिथून एक कावळा नुकताच उडून गेल्यामुळें तें कावळ्याचें होतें याबद्दल मला संशय वाटला नाहीं. कावळ्यासारखा अभद्र, कर्कश पक्षी; लोक त्याचा विटाळ मानतात; त्याचा कर्कश आवाज ऐकून कुणालाहि कसेंसें होतें. पण त्यालाहि त्या जीवनाची आवश्यकता असते अं ! तोहि आपल्या मादीला काटक्याकुटक्या आणून देतो तर ! आणि त्याची मादीहि पिलां-करितां कलाकुसर खर्च करून घरटें तयार करते तर—! !

“ कूऽहू— माझी लेखणी जागच्याजागीं थबकली. माझ्या

चित्तवृत्ती प्रफुल्लित झाल्या. कोकिळेचा स्वर तो ! स्निग्ध, मधुर, मंजुळ !—किती वर्णन करायचें ? आणि प्रयत्न करूनहि तें साधेल का ? हृदयाच्या आंतून आंतून निघालेला आलाप तो !

मी इकडे तिकडे पाहूं लागलों. " कूऽहु "—! पुनः स्वर ऐकूं आला. मी खिडकीजवळ गेलों. पूर्वेचें कोंवळें ऊन झाडाच्या शेंड्यावर सोनेरी रंग फांसत होतें. मधूनच एखादी मैना चिंवचिंवत असे. पांखरें घरट्याबाहेर उडून गेल्यामुळें फारशी किलबिल ऐकूंच येत नव्हती. फक्त एकच आवाज—" कूऽहु "

त्याच चिंचेच्या झाडांत तो दडलेला होता. पुनः एकदां त्यानें साद घातली. नंतर पंखाची फडफड—त्याच्या जवळ बसलेली कोकिळा—त्याची जीवनकला—फडफडून उडाली. तिची चंचल दृष्टि साऱ्या बाजूंना भिरभिरत होती. इकडे त्याच्या हृदयांतून सकंप पडसाद उठत होते.

त्या झाडावरून देखील ती उडाली. अगदीं त्याच पिंपळावर आणि त्याच घरट्याजवळ जाऊन बसली.–" अं ! " मी संशयांत पडलों. तें घरटें कावळ्याचेंच ना ? मी आणखी जवळ गेलों.

तिचे ते. तपकिरी छटा असलेले पंख, आणि चोंच – बाकीं कावळ्यांत नी तिच्यांत फरक नव्हताच. ती गुपचिप त्या घरट्यांत शिरली. माझी उत्कंठा वाढली. दुसऱ्या झाडावर चढून मी

पाहूं लागलों. तिनें आपले पंख पसरविले होते. ती दबून बसली होती—

— सभोंवार पाहत तिनें अंड्यांवर पाचोळा झांकला आणि पंख फडफड करीत ती उडून गेली. तिचा जिवलग त्या चिंचेच्या झाडांतच बसलेला होता. तिला जवळ घेऊन त्यानें तिच्या चोंचेंत चोंच खुपसली. विरहानंतरचें सुख त्याला मोहून टाकूं लागलें. त्यानें आलाप काढले. आतां त्याच्या आवाजांत कंप नव्हता. त्याची जीवसखी गानलुब्ध झाली होती. तिला आतां आजूबाजूला पाहण्याचें कांहींएक कारण उरलें नव्हतें. ती ऐकत होती—

—" कूहु कूहु कूहु कू ऽऽऽ हू " आंतून आंतून त्यानें आलाप काढला – त्याच्या हृदयांतील कोणत्या भावांचा प्रतिध्वनि असेल तो ? —

संध्याकाळीं थकून भागून कावळ्याची मादी येईल. भोळी बिचारी—तिला कळणारहि नाहीं काय झालें तें. मायेनें ती सारीं अंडीं पंखांखालीं झांकून घेईल आणि तशीच झोंपी जाईल.

पुरेशी ऊबऊन झाल्यावर त्या अंड्यांतून गींद बाहेर येतील. त्यांच्या त्या चिमुकल्या चोंचेंतून दिसणारा लाल गाभा—त्यांचा इवलाइवला आकार—त्यांचा नाजुक कलरव—घरट्याबाहेर हळूंच डोकावून भीतीनें आंत दडतांना त्यांची उडालेली तारां-

बळ— संध्याकाळीं मादीच्या पोटा-पोटांत घुसून निजण्याकरितां त्यांची चाललेली स्पर्धा—

....आणि एके दिवशीं त्यांतून कोकिळेचें प्रतीक उडून जाईल. आपल्याला कुणी वाढविलें याचा त्याला विसर पडेल व सूर्यानें सोनेरी रंग फांसलेल्या झाडांत लपून तें आवाज काढील —" कूऽऽहु "

खरंच ! किती गोड आलाप असतो तो ! किती सुख वाटतें आपल्याला !! तीच खरी कला—पण तिचा विकास कोणता ? विलास कोणता ? परंतु असले प्रश्न उपस्थित करणें म्हणजे अर-सिकपणा—!!

'कला, कला, कला,' म्हणून कोकिळेनें या झाडावरून त्या झाडावर उडावें—भोगतां येईल तेवढी चैन भोगावी व बिचाऱ्या कावळीनें लोकांनीं तिरस्कारानें चिडून मारलेले दगड चुकवीत चुकवीत पंख दुखवूनदुखवून दुरूनदुरून आणलेला चारा तिच्या पिलांच्या लाल कोवळ्या चोंचेंत मायेनें भरवावा. —आणि त्याच पाखरानें पुन: मोठें झाल्यावर रात्रंदिवस मौज मारीत स्वतःच्या कलेचें विकसन करावें !

जीवन ! कला !! विकास !!!

— यांचा परस्परांशीं कांहींच संबंध नसेल का ?

ता. १० ऑगस्ट १९३४

---

— १० —

# भाऊबंदांच्या प्रवृत्ती

दोनीहि बाजूला धार होती, पण तिथें ह्या डोहांतच पाणी संथ होतें. त्याची गति समजून देखील येत नव्हती. त्या डोहाच्या आंत घुसलेला खडकाचा कोपरा—तिथेंच मी आणि प्रभाकर बसलों होतों. आजुबाजूला कुणीच नव्हतें. नदीच्या रेताड वाळवंटांत चारदोन बगळे मात्र इतस्ततः उडत होते.

पलीकडच्या डोहांत एक कोळी जाळें पसरून फिरत होता. त्यानें सारें पाणी गढूळ करून टाकलें होतें. काय दुष्ट लोक!! त्या बिचाऱ्या माशांना विनाकारण त्रास. सांपडतील ते मासे आपल्या पोतडींत भरून कोळीदादा चालता होईल. बाकी राहिलेले अस्थिरपणें त्या गढूळ जीवनांत वावरत राहतील. त्यांना तो कोळी राक्षसासारखा वाटला असेल. स्वतःच्या जीवनाकरितां दुसऱ्याला जीवनापासून पारखें करावयाचें—राक्षसी प्रवृत्तिच ही! प्रभाकर तर माझ्यापेक्षांहि जास्त दोष देत होता कोळ्याला —"काय, बेट्यानें सारें पाणी खराब केलें!"

तो कोळी थोड्या वेळानें निघून गेला. त्याची ती पांढरी लंगोटी, काळें शरीर, मळकें जाळें व ती पोतडी, त्याच्याबरोबरच गेलें सारें! आतां आमच्याशिवाय त्या नदीवर कुणीच नव्हतें. किंचित् समाधान वाटलें आम्हांला!!

नदीकांठचीं तीं लव्हाळीं—हिरवीगार, आणि आंत पांढरीं फुलें फुललेलीं. त्यांचे ते कोंवळे कोंवळे अंकुर, त्यांचा तो नम्रपणा—किंचित् मोठ्यानें जरी लाट आली तरी दबून जायचें, पुनः भर ओसरल्यावर आपली पूर्वावस्था कायम! आंत जीवनांत शिरायचें तें अशा सुंदर लव्हाळ्यांतून—हा विचारच मुळीं मला आवडला, पण—! उगीच वाटलें—यांतच साप लपलेले असतात. आंत पाऊल टाकावयाचा अवकाश कीं लागले किडे गोंगाट करायला!!—जीव बुजून जायचा मुळीं!—

पाणी तरी किती शांत! त्या डोहांत आमच्यापासून सहासात हात लांब असलेला तो दगड, पण त्याचेंहि प्रतिबिंब पाण्यांत स्पष्ट उमटलेलें दिसत होतें. एकादी मासळी श्वास घ्यावयास वर येई; तिनें सोडलेल्या नाजूक श्वासानें इवलेंसें वर्तुळ पाण्यावर उठे आणि लागलेंच विलीन होई. आकाशांत आपल्या घरट्याकडे जाणारे पक्षी उडत; त्यांचें तें उडतें प्रतिबिम्ब पाण्यांत फडफडे—फार सुंदर दिसे तें! पाण्यावर एखादा किडा चालायचा; त्यांच्या त्या घसरण्यानें उठलेलीं लांबलांब वर्तुळें—वरून पाण्याची तेवढीच फक्त हालचाल!—

—पण त्या संथ प्रवाहाच्या पोटांत किती गडबड – धडपड ! असंख्य मासे वळवळ करीत होते. पाण्यांत कांहीं पडलें कीं मासे धांवायचे एकदम. माझ्या खिशांत असलेला चॉकचा पांढरा तुकडा मीं पाण्यांत टाकला. झर्कन् त्याला मासे चिकटले. लोह-चुंबकाला लोखंडाचा कीस चिकटतो —अगदीं तसेंच ! पण ती खाद्य वस्तु नाहीं असें पाहतांच पळाले बिचारे ! !

पाण्यांत आणखी एक प्रतिबिंब उठलें. एक बगळा उडत उडत त्या दगडावर येऊन बसला. त्याचा पांढरा शुभ्र रंग—स्वच्छ, शुद्ध, सात्त्विक भावांचा द्योतक; जणुं एकादा ऋषि भस्म चर्चून बसलेला. डोळे मिटलेले, पाय अगदीं ताठ, चोंच पाण्याकडे !

मधूनमधून आमच्या गोष्टी सुरू असत. त्यांना विषय नव्हता. कुठल्याहि गोष्टी काढायच्या. प्रभाकर नुकताच शहरांतून आला होता. त्याचें मन रमवायचें कसें तरी. त्याला ती शांतता मान-वली. मात्र त्या शांत आणि संथ डोहाच्या पोटांतहि जीवना-करितां धडपड चाललेली आहे हा त्याचा पहिलाच अनुभव. बाकी त्यानें वाचलें बरेंच होतें !

बोलतां बोलतां मध्येंच थोडी स्तब्धता येते. त्या अवधींत आम्ही पुनः इकडे तिकडे पाहत असूं. विशेष असें नाविन्य कोण-तेंच नव्हतें. सायंकाळ जास्त जास्त काळी होत होती; आणि दूरचा क्षितिजाचा भाग अस्पष्टसा – अंधुकसा दिसत होता.

तो बगळा मात्र तिथेंच बसलेला – अगदीं दगडासारखा. त्याचें पाण्यांत उठलेलें प्रतिबिंब तरी तरंगाबरोबर हालचाल करीत होतें; पण तो आपला शांत. त्याला ती संवयच झालेली. किती तरी बगळ्यांचें असें दृश्य मीं पाहिलें होतें! मासे देखील सारखे वळवळत; त्यांचीं तीं वर्तुळें तशींच उठत – सर्व तेंच – पुनः आम्हीं बोलण्यांत गर्क झालों.

इतक्यांत बाजूच्या देवळांतील घंटा घण्कन् वाजली. वाऱ्याबरोबर तो निनाद येतांच आम्हीं तिकडे पाहिलें. कुणीतरी दिवा लावायला आलें असेल हीच आमची कल्पना. एक पाठमोरी तरुण बाई देवळांत शिरत होती. नित्यनियमानें दिवा लावायला येणारी तीच एक विधवा होती.

मी प्रभाकरला तिच्याबद्दल सांगूं लागलों. ती आपल्या जीवाला किती कंटाळली आहे, परवां आमच्या घरीं आईजवळ येऊन ती किती रडली. मीं सर्व त्याला हळूहळू सांगितलें. तो ऐकत होता. त्याचें लक्ष मात्र नदीकडे होतें—

“ आणि प्रभाकर ” —मी त्याला सांगूं लागलों.

“ आश्चर्य हें कीं नवरा होता तेव्हां देखील तिला सुख मिळालं नाहीं. जीवनाचा एकेक मासला पाहिला कीं मोठं विचित्र वाटतं. तिचा नवरा जीवंत होता तोंपर्यंत त्याचे काय काय उद्योग चालले होते याची तिला बिचारीला कल्पना देखील नव्हती. तिची हीच कल्पना कीं सर्व संथ आणि शांत—”

" Oh ! look ! wonderful—" प्रभाकर एकदम ओरडला. मी पाण्याकडे पाहिलें. बगळ्यानें पटकन् दोन मासे आपल्या त्या लांब चोंचेंत धरले आणि पंख हालवीत तो उडून गेला —

— पाणी तसेंच शांत होतें, तितकेंच स्वच्छ; तेंच दृश्य, तींच प्रतिबिंबें — कांहींहि फरक झाला नव्हता ! !

" पण ते मासे जीवनांतून नाहींसे झालेच ना ? " मीं त्याच्या त्या उद्गारावर प्रश्नार्थक उत्तर दिलें. तो कांहींच बोलला नाहीं. त्याची दृष्टि त्या बगळ्याकडेच होती. किती शिताफीनें त्यानें मासे पकडले – हाच त्याच्या दृष्टींत अर्थ भरलेला होता !

तो बगळा सावकाश उडत गेला. पूर्णपणें क्षितिजांत मिळून जाईपर्यंत मी त्याच्याकडे पाहत होतों. त्याचे पांढरे शुभ्र पंख–सात्विकता–शुद्धता–विमलता यांचें प्रतीक – त्या काळोखांतहि बराच वेळ दिसत होते.

कोळ्यानें पाणी गढूळ केलें; माशांना त्यानें अमानुषपणें जीवनापासून विलग केलेलें स्पष्ट दिसलें. त्याची ही कृति राक्षसी — त्रासदायक — विघातक ........! !

आणि बगळ्याची मात्र ? ? ! !

ता. ५–९–४३

---

— ११ —

# कला : : : : जीवन

कॉलेजचा दुसरा मजला. ती विस्तीर्ण गच्ची. त्यापलीकडे दिसणारा बागेचा आणि आकाशाचा देखावा. शिवाय ती खिडकी – बागेवरून येणारा गार वारा प्रथम तिथेंच यायचा.

प्रिन्सिपालनीं त्याच हॉलमध्यें अर्थशास्त्राचा तास ठेवण्यांत मोठें औचित्य दाखविलें होतें यांत संशय नाहीं. आंत रुक्ष विषयाची शिकवण आणि बाहेर सृष्टि व आकाश यांचा नेत्रसंकेत !– पावसाळे दिवस !

“ अग ! पण वेणी सोड ना माझी ”— पुनः माझें लक्ष तिकडे वेधलें. पांचसहा मुली बागेंतील गालिच्यावर मोकळेपणानें बसल्या होत्या. त्या गालिच्यावरची नक्षी म्हणजे त्यांच्याच पावलांनीं पडलेली आणि तिथलें गवत तुडविलें गेल्यामुळें किंचित् काळसर दिसणारी पाऊलवाट ! पण ती हिरवीगार, मऊमऊ, जीवनरसानें रसरसलेली हिरवळ — गालीचा म्हणायचा झाला तरी नीटशी कल्पना येत नाहीं.

उंचशा बारिक बारिक पानांच्या झाडांवर पिंवळीं पिंवळीं फुलें भडक उठून दिसत होतीं. बाजूलाच वेलींची जाळी. त्या-

वरील ते सुंदर भरदार घोंस !– मुलींची अजून नजर न फिरकल्या-मुळें फुललेले दिसत होते. आणि त्यांनींच ती जाळी मुसमुसल्या-सारखी दिसे.

आतां तासाची घंटा होईल. भराभर मुली पळतील. कोंवळीं कोंवळीं पानें, पिंवळीं निळीं फुलें, शक्य तितक्या कल्पकतेनें त्या आपल्या डोक्यांत खोंवतील. हिंदु मुली खोंचतात डोक्यांत फुलें, पण आमच्यांत ?–– मला नीना आठवली. तिला तर फूल हातीं घेऊन त्याच्याशींच खेळत चालण्याचा नाद. पलिकडे दिसणारा गुलाब तिची वाट पाहत होता. फूलच फूल ! पण किती आतुर दिसलें तें ! वारा भिरभिरला कीं एकदम नाचूं लागे. जणुं स्वतःबरोबर घेऊनच जाणार होता तो वारा त्याला !

तें कारंजें ! त्या एकजात हिरवळीवर उठून दिसे. मला बेसीच्या सतेज मुखावरील डाव्या बाजूच्या तीळाची आठवण झाली. सारी बाग थबथबलेली दिसत होती. वर्षाऋतु तो ! किती सुंदर होता आजचा दिवस ! !

एकदम आकाश भरून आलें. काळे काळे ढगांचे पुंजके. सारें आकाश झांकून टाकलें होतें त्यांनीं ! सोसाट्याचा वारा त्यांना गति देत होता. ते एकमेकांशीं चिकटून एकरूप झाले होते. किंचित् थोडा वेळ; आणि लागलेच मोती गळायला. नंतर धारा – जणुं मोत्यांच्या सरीच त्या ! सारी बाग जलमय झाली. सारा प्रदेश पावसाच्या फवाऱ्यांनीं दूधमय झाला. किती मनोहर

दृश्य तें ! साऱ्या मुली केव्हांच पळून गेल्या होत्या. माझें लक्ष केव्हांच उडून गेलें होतें. त्या खिडकींतून अतृप्त नेत्रांनीं मी तें सारें पाहत होतों—

कला म्हणाली–" पाहा, पाहून घे, पाहतच रहा !"

ता. ८ ऑगष्ट १९३२.

*                *                *

पावसाळा ! मला नेहमींच आवडतो तो ऋतु ! त्यांत माधुरी नसेल – वत्सलता मात्र खास; अगदीं कांठोकांठ – बाहेर हेलकावते आहे जणूं ! किती टवटवीत

तरी मला वाटलेंच ते डोंगर इतके उंच उंच कां जात आहेत. हा एक, दुसरा त्याहून उंच, तिसरा त्याहूनहि. अगदीं उंच उंच सुळके. काळ्या काळ्या ढगांना भिडलेले. किंचित् त्यांच्याहि वर गेलेले. कदाचित् त्यांनाहि वाटत असेल – वर काय आहे ? कोणत्या दिव्यत्वाचें सत्यदर्शन ? दिव्यत्वाची परिसीमा कोणती ? सौंदर्य कोणतें ?–विकास कोणता ? ? – एखाद्या महर्षीसारखी जिज्ञासा.—आणि त्यांची ती जिज्ञासा पूर्णहि झालेली दिसत होती. त्यांना कसला तरी आनंद झाला होता. ते खुलून उठले होते.

हिरवी सृष्टि—तिनें आपल्या पोटाखालीं डोंगरावरील दगड, धोंडे, खांचा, खळगे, सारे दडवून ठेवले होते. आणि एकच रंग — हिरवा ! !

मी एकटाच चाललों होतों. दोनीहि बाजूला, मागें पुढें, निसर्ग आणि त्याच्या मध्यें वाट काढणारा मी ! ही कल्पनाच मुळीं माझ्या हृदयाला जाऊन भिडली. ते छोटे छोटे प्रवाह कसे खिदळत होते ? कसे पळत होते ! ! एखादा मोठा दगड मध्यें आला कीं चटकन् त्याच्या भोंवतीं गिरकी खायची, नि पुढें खळखळायचें ! जणुं पुढें कुणाला धरायचेंच आहे ! ! सारे आपल्याच नादांत ! कुणाचें कुठेंच लक्ष नाहीं.

सर्वत्र शांत— ! माणसाचा वारा नाहीं. घराचा आसरा नाहीं. मध्येंच एकाद्या पक्षाची किलबिल ! मध्येंच प्रचंड घनगर्जना—! !

—पुन्हां तोच गंभीर निनाद – दुंदुभीच वाजली देवाघरची ! आतां हिऱ्यामाणकांची लूट; नंतर सोसाट्याचा वारा; नंतर पावसाच्या धारा—सृष्टीचा गडगडाट—सारा प्रदेश जलमय होणार —आजूबाजूला कुणी — कुणी नाहीं अगदीं..........! !

जीवन म्हणालें – " बघतोस काय ? पळ ऊठ. जा अन् कुठं तरी आसऱ्याला उभा राहा– " कांहीं सुद्धां सुचलें नाहीं मला !

\+ \+ \+

हीं दोनीहि पानें एमिलच्या रोजनिशींतलीं जुनीं म्हणून माझ्याच घरीं विसरला तो ! नेईल सावकाश. हरविलीं नाहींत म्हणजे झालें – हीच त्याला भीति !

ता. १५-८-३४.

---

— १२ —

# कांचेची किमया

सहा वर्षांचा देखील नव्हतों मी तेव्हां. नुकताच कोठें शाळेंत जाऊं लागलों होतों. गणूदादा इंग्रजी दुसरींत होता. एकादा नवीन शब्द माहित झाला म्हणजे त्याचा पुनःपुन्हां उच्चार करण्यांत, आणि त्याचा अर्थ ताईला अन् मला सांगण्यांत त्याला मोठी मौज वाटे.

नुकताच तो आपल्या पुस्तकांतला "रामू आणि न्यायाधीश" हा धडा शिकला होता. शाळेंतून घरीं येतांच गणूदादानें मला सांगितलें,

"आपल्यापेक्षां मोठ्या असलेल्या माणसाला नमस्कार करावयाचा असल्यास इंग्रजींत त्याला "गुड् मॉर्निंग्" म्हणतात."

झालें! आई, ताई, गणूदादा या सर्वांना मी सकाळ–संध्याकाळ 'गुड् मॉर्निंग्' करायचा! बाबाच काय ते एक सुटले होते. कारण....!

* * *

जूलिया बरीच उंच होती, खूब गोरी होती आणि ती सुरेख पण होती. सायकलवरून इकडून तिकडे मारे मिरवत असे नेहमीं. थोरा-

मोठ्यांची मुलगी. बाप जिल्हाधिकारी. तिला कशाची वाण असणार ? तिचा बंगला अगदीं शहराचे बाहेर—फार दूर होता. संध्याकाळीं फिरावयास जातांना ती शहराकडे—शहरांत नाहीं— येत असे.

एकदां संध्याकाळीं जूलिया येत होती. मी जात होतों. मीं तिच्याकडे पाहिलें. तिनें माझ्याकडे पाहिलें. मी तिला " गुड् मॉर्निंग् " केलें; कारण ती माझ्यापेक्षां मोठी होती. आमच्या ताईइतकी—किंबहुना जास्त–सुंदर होती.

सौंदर्याकडे पाहण्याची माणसाला चटकच असते. तिनें नुसतें हंसून माझ्याकडे पाहिलें.

ती मला इतकी चांगली दिसे कीं मला तिच्याशीं नेहमींच बोलावेंसें वाटे.

ती मला येतांना दिसे. मी तिला जातांना दिसें. किती तरी दिवस आमचें 'गुड् मॉर्निंग्' चाललें होतें.

एका गुरुवारीं संध्याकाळीं ती अशीच मला भेटली. रोजचा " गुड् मॉर्निंग् "चा विधि संपल्यावर ती—त्याच दिवशीं तिला काय वाटलें कोण जाणे !—सायकलवरून खालीं उतरली आणि माझ्याजवळ आली.

" तुझं नांव काय आहे ? "

आँ ! अरे हिला मराठी येतें ? मी आश्चर्यानें तिच्याकडे नुसता पाहत राहिलों. तिनें पुन्हां विचारलें.

" क्षितीन्द्र " मीं उत्तर दिलें.

" आमच्या घरीं येतोस ? "

मी 'होय' म्हणूं शकलों नाहीं आणि 'नाहीं' म्हणणें माझ्या जीवावर आलें. तिनें मला सायकलवर बसविलें व सायकल आपल्या बंगल्याकडे वळविली !

तिचा तो झब्बूदार कुत्रा फार चांगला होता. आम्ही खालीं उतरतांच तो आमच्या जवळ आला. तिनें मला संत्रीं दिलीं, पेपरमिंट दिलें व थोडा वेळ गप्पागोष्टी केल्यावर तिनें मला दोन-तीन फर्लांगावर असलेल्या आमच्या बंगल्यावर आणून सोडून दिलें.

जूलिया माझ्या ओळखीची झाली. माझ्याशीं मराठी बोलण्याइतकें ज्ञान तिनें आपला म्हातारा शिपाई विठू याच्याकडून मिळविलें होतें.

* * *

आज मी नवीन ज्ञान शिकलों होतों. 'सिस्टर' म्हणजे बहीण !

जूलिया संध्याकाळीं भेटणारच होती. तिची भाषाच इंग्रजी ! मीं तिला विचारावयाचें ठरविलें.

नेहमींप्रमाणें आम्ही एका हिरवळीवर जाऊन बसलों. मीं एकदम तिला प्रश्न केला.

" जूली ! 'सिस्टर' म्हणजे काय ? " कां कोण जाणे, तिनें झटकन् उत्तर दिलें नाहीं. थोडा वेळ थांबून ती म्हणाली, " सिस्टर म्हणजे भाई. "

मला वाटलें कीं हें उत्तर देतांना ती मिस्कीलपणें हंसत असावी.

" भँई ! " मी तिला चिडविलें. " अग ! ' सिस्टर ' म्हणजे बहीण. " मी दुरुस्ती केली.

" छे, मुळींच नाहीं. सिस्टर म्हणजे भाऊ " ती म्हणाली. मी समोरच बसलों होतों. तिनें माझ्याकडे पाहून नाक उडविलें, कपाळाला लाडक्या आंठ्या पाडल्या, माझे गाल धरले, मला जवळ ओढलें व " भाऊ, भाऊ, अग भाऊ " करीत ती माझे मुके घेऊं लागली.

असा कांहीं प्रकार झाला म्हणजे मी शेफारून जाई. घरीं ताईनें कांहीं म्हटलें म्हणजे मी म्हणें, " अग जा ! तुझी आतां मला गरज नाहीं. " आणि खरंच ! गरज भासण्याची वेळ फक्त स्नान करून आल्यावर केस नीट करून घेतांना येई तेवढीच.

\+ + +

जूलियाचे घरीं जाण्याची आतां मला संवय लागून गेली होती. मी नेहमीं सुटीच्या दिवशीं तिच्याकडे जाई.

ती मला कधीं कधीं रडतांना दिसे. ती रडरड रडे. मध्येंच मी आलों म्हणजे मला जवळ घेई, आणखी रडे.

कांहींवेळ रडल्यावर थकून जात असे बिचारी! पुन्हां आम्ही फिरावयास जात असूं!

ती कां रडे हें मला त्यावेळीं सांगून समजत नसे. आतां सर्व नीट कळतें. जूलियेला बहीण नव्हती, भाऊ नव्हता व आई फार लवकर तिला सोडून गेली होती. सर्व करील तें बाप!

तो देखील बिचारा कर्तव्यानें–जबाबदारीनें–बांधला गेला होता. आणि पुष्कळ वेळीं जूलियेचे डोळ्याचे अश्रू स्वतःच्या हातानें पुसण्यापेक्षां त्याला ते टेबलावरील टिपकागदानेंच पुसावे लागत!

जगांत प्रेमापेक्षां कर्तव्य श्रेष्ठ असतें. त्याचा संबंध पोटाशीं येतो.

मी तिच्याकडे गेलों नाहीं म्हणजे ती येऊन मला घेऊन जाई. एरवीं मी तिच्याकडे जात असेंच!

काल गणूदादानें कॉपिंग पेन्सील माझ्या जिभेवर उमटविली होती. ही गम्मत बरी आहे म्हणून रडून मी तो तुकडा गणूदादा-जवळून मागितला. येऊन जाऊन गम्मत करावयाची कुणाशीं? सर्व मेतकूट जूलियेशीं होतें!!

त्या दिवशीं तिला बरें वाटत नव्हतें म्हणून मला विठू घेऊन गेला. ती निजली होती. मला तिनें जवळ बोलाविलें—अगदीं

घट्ट धरून ठेवलें व नेहमींप्रमाणें माझे गाल पिळले, हंसऱ्या मुलांना रडविण्यांत पुष्कळांना मौज वाटते, तशीच माझे गालगुच्चे घेऊन ते गुलाबी झालेले पाहण्यांत तिला मौज वाटे.

त्या दिवशींहि ती हंसली !

" जूली ! तुला एक गम्मत दाखवितों. तूं पाहूं नको बरं का ! "

मी तिच्या उजव्या गालाजवळ तोंड नेलें. त्यावर तोंडानें वाफारा सोडला. तिच्या डोळ्यांवर एक हात ठेवला व हळूच तो तुकडा काढून मी तिचें नांव लिहिलें. तिच्या पिंवळ्या गुलाबी गालावर तें खूप जांभळें उमटलें. मी हंसूं लागलों. नंतर जवळचा आरसा घेऊन तिचें ' रूप ' दाखविलें !

तिनें तें रूप पाहिलें. ' हूँ ' करून नाक उडविलें. माझ्या हातून आरसा घेतला व तिच्या गालावर माझा गाल ठेवून ती आरशांत पाहूं लागली. आम्ही दोघेंहि एकाच वर्णाचीं होतों. ती आजारामुळें थोडी फिक्कट दिसत होती. बराच वेळ आम्ही तसेच राहिलों. ती हंसली व एकदम तिच्या डोळ्यांतून पाणी आलें. ती रडली म्हणून मी रडलों.

त्या दिवशीं रात्रीं मी तेथेंच होतों. माझ्या घरीं विठू सांगून आला होता. त्या रात्रीं तिला बऱ्याच गोष्टी सांगितल्या. आमची ताई कशी आहे; ती मला कशी रागावते; तूं माझ्यावर रागावत नाहींस, तूं चांगली आहेस ! !...एक होता चांदोबा, त्याचे घरीं एकदां लग्न होतें. सर्व चांदण्या तेथें गेल्या होत्या......!

माझी गोष्ट सांगतां सांगतांच मला झोंप लागली !

असें बरेच दिवस चाललें. मला जूलीवांचून बरें वाटत नसे व तिला क्षितिन्‌वाचून चैन पडत नसे–पण......!

एक दिवस जूलियेची मावशी आली व तिला दूर, दूर,– ज्या देशाचा त्या वेळीं मला भूगोलदेखील माहित नव्हता अशा ठिकाणीं घेऊन गेली ! मीं तिला एका सुंदर फुलझाडाचें चित्र बक्षिस दिलें होतें. तिनें मला जातांना एक जादूची कांच बक्षिस दिली होती. त्या कांचेतून वस्तू फार मोठ्या दिसत असत.

आतां तिच्या देशाचा भूगोल मास्तर मला शिकवितात. ते म्हणतात, "या इथें टेम्स नदीवर लंडन शहर आहे."

" सर, तेथें जूलियेचें घर असेल नाहीं ? " मला हा प्रश्न विचारावा असें कितीदां वाटे. पण !—पुन्हां वाटे विचारूंच नये !

वर्षांमागून वर्षें जात आहेत. मला आतां सर्व समजतें. भाऊ नसला म्हणजे बहीण का रडते ! बहिणीच्या अभावीं भावांना उदास कां वाटतें, वगैरे सर्व कळतें मला आतां ! आणि असें एखादे वेळीं वाटलें म्हणजे जूलिया माझ्यासमोर उभी राहते.

अठरा वर्षांच्या, रूपानें सुंदर, बांध्यानें उंच अशा कित्येक मुली सायकलवर जातांना मला दिसतात. एके काळीं जूलि

अशीच जात होती व माझ्याकडे पाहून हंसत मला बरोबर नेत होती. या दुसऱ्या माझ्याकडे पाहत देखील नाहींत !

+ + +

जूलि कोठें असेल ? तिला माझी आठवण होत असेल का ? तिच्या गालावर मी अनेकदां ठेवलेला गाल ! तिला सांगितलेल्या गोष्टी....! या सर्वांची आठवण नसेल का तिला ? एकाहि प्रश्नाचें उत्तर मला निश्चितपणें देतां येत नाहीं. आणि असे प्रश्न उपस्थित झाले म्हणजे मनाची स्थिति फार केविलवाणी होते.

जूली ! तुला मी विसरलों नाहीं. उभ्या जन्माची हुरहूर लाविली आहेस तूं ! पण !—त्यांतहि आनंद आहे. दुःखांतच मागील सुख आठवतें. आणि हळूहळू त्याची किंमत वाढत जाते. मग असेंहि वाटतें कीं तें अमोल आहे म्हणून !

आमच्या ताईसाहेब ! त्यादेखील आतां आमच्या जवळून दूर गेल्या ! मला वाटतें तिनें मला खूप पत्रें पाठवावींत, पण ती – तिला काय काम असतें माहित नाहीं – कधीं कधीं फार उशीर करते उत्तर धाडायला.

जूलि एकदम आठवते ती अशाच वेळेला ! अशी आठवण झाली म्हणजे मी टेबलाचर डोकें ठेऊन स्वस्थ पडतों. कांहीं वेळ असाच जातो. नंतर अनायासें हात खिशांत जातो व तीं जूलीनें दिलेली कांच घेऊन येतो. दुसरा हात टेबलावर आंथरलेल्या कागदावर लिहितो.

" जूलिया "

ती कांच मी नीट धरतों. त्या अक्षरांवर ठेवतों. नंतर ती उचलतों. त्या कांचेची किमया सुरू होते. तो कागद जसजसा दूर न्यावा तसतशीं तीं अक्षरें मोठीं मोठीं होत जातात.—

"जूलिया !"

"जूलिया ! !"

"जूलिया ! ! !"

आणि नंतर तीं इतकीं मोठीं होतात कीं तेथें कांहींच दिसत नाहीं !

ता. ३–४–३३.

---

— १३ —

# आणभाक

जी गोष्ट आपल्या हातून अजाणतां घडली ती योग्य होती कीं अयोग्य होती याचा मला आतां नीट विचार करतां आला किंवा त्या गोष्टीच्या मुळाशीं असलेलीं कारणें मला आतां शोधून काढतां आलीं तरी तिच्यामुळें झालेला एक प्रकारचा परिणाम मात्र माझ्या मनावर पगडा बसवूं पाहतो. काय असेल तें असो, पण असें वाटतें कीं आपण तिला उगीच भेटलों.—?—पण मला तरी काय माहित ?

दिवसभराच्या धकाधकींतून वेगळा झाल्यावर तिसांजीला अंधुक उजेडांत चटईवर पडलों म्हणजे उगीचच निरनिराळे प्रश्न माझ्या डोक्यांत थैमान घालतात. माझ्या गतायुष्यांत इतक्या कांहीं गोष्टी घडल्या आहेत कीं, त्यांच्या बऱ्यावाईट स्मृतीनें मी शेषायुष्य सुखावह करूं शकेन.

दुःखकारक कां असेना, पण गतायुष्याच्या आठवणी किती गोड असतात ? कितीतरी व्यक्ती डोळ्यांपुढें येतात, पुन्हां

नाहींशा होतात; कितीतरी प्रसंग आठवतात व ते देखील झर-झर मागें सरतात—उगीच वाटतें, त्यांच्याकरितां थोडेंसें रडावें, थोडा विचार करावा व मनाला विसावा द्यावा !

आणि माझा तर असा अनुभव आहे कीं मी कितीहि दुःखांत असलों आणि मला जूलियेची आठवण झाली कीं दुःखांत सुख वाटतें—अश्रूंत आनंद वाटतो—! !

एकामागून एक अशा कितीतरी आकृती पडद्यावर हलत-झुलत येतात. त्यांच्याकरितां दोन दोन थेंब जरी डोळ्यांवाटे काढीन म्हटलें तरी अंतःकरणाची झर कायमची सुरू राहील. —पण राहिली तरी काय हरकत आहे ? सुखदुःखाच्या आठवणींनीं झरून झरून आयुष्य उजळ करतां आलें व तसेंच पंख फडफडून उडतां आलें तर कुणाला नको आहे ?

माझा दृष्टिकोण इतरांच्या उपयोगीं पडेल किंवा नाहीं हें मी कसें सांगूं ? मला मात्र त्यामुळें समाधान वाटतें. नव्या जगाकडे पाहतांना उगीच म्हणावेंसें वाटतें —माझी जूलि—! ! माझी—! ! !

जूलिया माझ्या स्मरणांतून जशी कधींहि जाणार नाहीं तशीच आणखी एक व्यक्ति—!

पण तिचें नांव न सांगण्याची मीं शपथ घेतली आहे. ती मी कधीं मोडणारच नाहीं !—

—आणि नांव सांगून तरी उपयोग काय ? सुधारलेल्या जगाच्या शंकाकुशंकांना उगीच जागा करून देऊं का ? जगानें जर सहानुभूतीनें विचार करावयाचें सोडलें तर—! !

मात्र मी एवढें सांगतों कीं, ती आतां कमींतकमी अठरा वर्षांची असेल; कारण त्यावेळीं ती माझ्या वयाचीच होती—किंचित् एकाद-दुसऱ्या वर्षाचा फरक ! ती आतां कुठें असेल हें मी सांगूं शकणार नाहीं; कारण मला त्याबद्दल कांहींच माहिती नाहीं व मीं तसा प्रयत्न पण कधीं केला नाहीं.

परवां परवां ती मला भेटली होती. दोन वर्षांपूर्वीची गोष्ट. जालम स्टेशनवर दादा उतरले, तेव्हां अचानक तिचे वडील तिथें भेटले; ते असेच कुठल्याशा गांवाला जाणार होते. त्यांच्याबरोबर ती होती व तिची आई होती.

आठ नऊ वर्षांनंतर तिची माझी भेट झाली—मला आनंद झाला. कांहीं वेळ पुनः जुन्या जगांत प्रवेश करावयास मिळणार म्हणून अंतःकरणांत वाढविलेल्या कळ्यांचीं फुलें झालीं व हंसत हंसत मी नानांच्या मागून चालूं लागलों.

स्टेशनच्या एका बाजूला हिरव्या पेटीवर ती बसली होती व तिच्याजवळच तिची आई बिछान्याला टेकली होती. मीं काकूंना नमस्कार केला व तिच्याकडे पाहिलें—अगदीं हंसून पाहिलें—ती हंसेल, तिच्या हंसण्यांत मागच्या मनोहर स्मृती जाग्या होतील

व आपला आनंद दुणावेल—म्हणून मी तिच्याकडे आशेनें पाहिलें—

—पण तिच्या ओठांवर हास्य दिसलें तरी कपाळावर आंठी पडली होती ! !

"अँ !" माझ्या तोंडून अस्पष्ट असा आश्चर्योद्गार निघाला. तो तिला ऐकूं गेला नाहीं. पुनः मी तिच्याकडे पाहूं लागलों.

हिरव्या गर्द झाडपाल्यांत झांकलेल्या टपोर कळीसारखी दिसत होती ती; आणि तिच्या मुखावर रक्तिमा पसरला होता. ती माझ्याशीं बोलत होती. पण त्या बोलण्यांत आपलेपणा नव्हता; ती माझ्याबरोबर हंसत होती. पण त्यांत औचित्य नव्हतें; ती माझ्याकडे पाहत होती, पण त्यांत स्निग्धपणा नव्हता – मोकळेपणा नव्हता; उलट भेदरलेल्या हरिणीसारखी किंचित् कावरीबावरी होऊन संशयी दृष्टीनें ती माझ्याकडे पाहत होती आणि तिच्या कपाळावरची आंठी कायम होती !

माझा जीव उडूं लागला. आमच्यांत फरक पडला म्हणून असें झालें का ? आमच्याजवळ बोलावयास कांहीं नव्हतें म्हणून असें झालें का ? पण छे ! तसें असणें शक्य नव्हतें—

सांजवाती लावल्यापासून आई जेऊन येईपयत एकाच पांघरुणा-खालीं दडून तिला मी कित्येक कहाण्या सांगितल्या होत्या; गाईची धार काढून त्यांना सोडल्यापासून त्या परत येईपयत मी तिच्या मनाजोग्या कित्येक बाहुल्या कित्येकदां करून दिल्या

होत्या तिला! दिवसभर खेळतांना व धिंगाणा घालतांना आमच्या बाळपणींच्या खेळांकरितां आम्हांला मोठ्या माणसांच्या खेळांतून पुष्कळ वस्तू आणाव्या लागत. त्या मी कित्येकदां तिला चोरून आणून दिल्या होत्या व माझ्यावर त्यामुळें किटाळ आल्यावर मला मार बसूं नये म्हणून तिनेंहि कित्येक आगळिकी आपल्याकडे बळेंच ओढून घेतल्या होत्या.—आमच्या दोघांच्याहि अंतःकरणांत बेदिली नसती तर ह्या गोष्टी बोलतां बोलतां आम्हांला दिवस पुरला नसता; पण—

तिच्या कपाळावर उमटलेली आंठी—

—आणि माझ्या जीवाची चाललेली कालवाकालव ! !

या दोन गोष्टींनीं आम्हांला औपचारिक भाषणाशिवाय बोलूं दिलें नाहीं. बाह्यतः एकमेकांशीं बिलगलेले जीव अंतर्यामीं अलग असतात असें कित्येक वेळीं आपल्या दृष्टीस पडतें; त्याचा मला अनुभव आला.

काकूंनीं माझ्यासमोर ठेवलेलें फराळाचें संपल्यावर मीं त्यांना नमस्कार केला व कांहींतरी निमित्त काढून परतलों. येतांना मीं तिच्याकडे पाहिलें. तों तिच्या हंसण्यांत कशाची तरी असहायता होती, तिच्या दृष्टीनें कांहींतरी अपेक्षा केली होती.

*　　　*　　　*

पण आमच्या हातून जाणूनबुजून अशी कोणतीच चूक झाली नसतांना तिला असें कां वाटावें ? म्हणण्यासारखी जी चूक

आमच्या हातून घडली त्याबद्दल आमच्यापैकीं कुणालाच जबाबदार धरतां येत नाहीं. मला जसें कळतें तसेंच तिला कळत नसेल का ? तिला कळलें पाहिजे असें मला वाटे, पण पुन्हां वाटे स्त्रीजात ! नेहमीं पुरुषांच्या मागून जाणारी ! पुरुषप्रकृतीच्या संशयी वृत्तीस बळी पडणारी, निर्भयपणें एकादी गोष्ट योग्यअयोग्य ठरविण्याची पात्रता त्यांच्यांत ठेविली असते का ?

पांढऱ्या शुभ्र दुधावर सुरकुत्या कां पडतात ? त्याखालीं जळजळीत निखारे असतात म्हणून ! तिच्या भालप्रदेशावर आंठी पडली ! बाह्य वातावरणाची—जगाच्या हिस्सेवांटणींत स्वतःकडे आलेल्या असहाय व्यक्तित्वाची—आंच तिला लागली होती.

मी परतलों तेव्हां माझ्या मनांत हेच विचार सुरू होते. मी येतांना तिचा प्रेमळपणें निरोप घेऊं शकलों नाहीं. आम्ही आतां पुढच्या आयुष्यांत काय करणार आहोंत याची एकमेकांना यत्किंचितहि कल्पना नसतांना, यापुढें आपली कधीं भेट होईल किंवा नाहीं याची शाश्वति नसतांना—आम्हीं एकमेकांशीं मोकळ्या मनानें बोलूं शकलों नाहीं; उलट एकमेकांमध्यें अंतर कायम करून आलों.

पुढेंमागें तिची माझी अशीच एकादेवेळीं भेट झाली तर—?

—तिच्या कपाळावर अशीच आंठी दिसेल का ? आणि माझा जीव असाच उडेल का ? मला कसेंसेंच वाटलें ! !

मी गाडींत बसलों व ती चालू झाली तरी मला शुद्ध नव्हती. राहून राहून मला वाटे, आमच्या आड कोण येत आहे ? आमच्या हातून घडलेले प्रमाद ? पण ते प्रमाद घडावयाला कारण कोण ? नदीकांठच्या उघड्या पडलेल्या ओलसर मऊ मातीवर कोणताहि ठसा पडला तर त्याला जबाबदार कोण ?

मला पक्के आठवतात ते दिवस ! जूलिया गेली तेव्हां मी आठ वर्षांचा होतों. मला कसेंसेंच वाटे व माझ्या डोळ्यांसमोर अंधुक अंधुक दिसे. ते नेहमीं भरून येत. मला माझें मन रमविणें भाग होतें. लहान मुलांचें मन कशांतहि रमतें म्हणतात, पण त्यांना ज्या गोष्टीची संवय असते, त्यांतच त्यांना मौज वाटते.

कसें तरी मन रमावें म्हणून मी, ताई व तिच्या मैत्रिणी यांमध्यें मिसळूं लागलों. जूलिया असतांना मी तिच्या अस्तित्वाविषयीं देखील पूर्ण बेफिकीर होतों. पण आतां तीच ताई मला गोड वाटूं लागली होती.

" ती " देखील आमच्या घराशेजारींच राहत होती. ताईची मत्रीण होती ती. आम्हीं तिघेंहि खेळत असूं. मला " तिच्या "–विषयीं प्रेम वाटूं लागलें व ती देखील माझ्याशिवाय खेळेनाशी झाली. लहान मुलांचें प्रेम कुणावरहि बसतें व कुणावरूनहि उडून जातें !

लपंडावाचा खेळ खेळतांना तिचे डोळे झांकावयाचा प्रसंग माझ्यावर कधीं कधीं येई. मी त्यावेळीं आपले चिमकुले हात तिच्या डोळयांवर ठेवतांना बोटांमधील अंतर जास्त करून तिला पाहवयास अवसर देत असें. माझ्या या कामगिरीबद्दलचें बक्षिस ती माझ्याकडे लोभस दृष्टीनें हंसून देत असे.

किंचित् काल मला जूलियेची आठवण झाली नाहीं. बरो-बरीचा खेळगडी मिळाला म्हणजे मग सहज मन रमतें. मोठ्या माणसांच्या खेळांत देखील असेंच होतांना मी आजकाल पाहतों. असो.

पुढें एकदां आमचें एकदम भांडण झालें. एक दिवस पहांटे झाडाखालीं जाऊन मी पारिजाताचीं पुष्कळ फुलें आणलीं व अर्धीं तिला दिलीं. ती खूप खूष झाली. आम्ही फुलांशीं बराच वेळ बोलत होतों.

जसजसा सूर्य वर सरकूं लागला तसतशीं तीं फुलें कोमेजून जाऊं लागलीं. आम्हांला कसेंसेंच वाटलें! त्यांचा सुवास नाहींसा होऊं लागला, आम्ही उदास झालों!

" काय रे क्षिती! सकाळीं यांना वास कुणी दिला होता?" ती म्हणाली.

"अग, झाडानें! झाड म्हणजे त्यांची आई"–पुरुषांना स्वतःचें ज्ञान मिरविण्याची हौस असते, त्याच हौसेनें मी म्हणालों.

" नाहीं, देव देतो त्यांना ! तो आपल्याला कां देत नाहीं रे वास ? अन् मग त्यांचा सुगंध तो काढून कां घेतो मागाहून ?

" अग, देव देतच नाहीं मुळीं त्यांना तो सुगंध ! देव कसा देईल ! तो तर देव्हाऱ्यांत असतो. "

झालें ! या क्षुल्लक कारणावरून आमचें भांडण झालें. ती रुसली. मी देखील संतापलों. मीं करून दिलेल्या बाहुल्या, खेळणीं तिनें भिरकावून दिलीं; मीं चिडून तिला सडकून चिमटे घेतले; तिनें सूर काढला.

माझ्या आईनें मला दादांच्या स्वाधीन केलें. तिच्या आईनें तिच्यावर आपला राग काढून घेतला.

दादांनीं मला मारलें नाहीं, पण भयंकर भीति दाखविली; अन् तीन तीनदां ते म्हणत होते " लहान आहेस का तूं आतां मुलींमध्यें खेळायला ? "—

—तिलादेखील तिच्या आईनें दम भरला. " खबरदार ! उद्यांपासून मुलांमध्यें खेळतांना दिसलीस तर—"

बरेच दिवस—म्हणजे तीनचार—आम्हीं एकमेकांशीं बोललों नाहीं व त्यामुळें हंसलों देखील नाहीं. माझ्या माडीवर खिडकींत मी बसलों म्हणजे तिचे घरचे मागचे अंगणांत, सकाळीं ती मला दिसे. आम्ही एकमेकांकडे पाहत असूं, आम्हांला आनंद होत असे, पण—

" आई, " तिचे डोळे म्हणत !

—आणि " बाबा, " माझे डोळे म्हणत ! !

माझ्या बालबुद्धीला मी त्यावेळीं बराच ताण दिला, पण तिच्याशीं न खेळण्यासारखें असें मला माझ्यांत कांहींच दिसलें नाहीं. मी असा किती मोठा झालों कीं मुलींत मीं खेळूं नये ? ती इतक्यांत कशी मोठी झाली कीं तिनें मुलांत खेळूं नये ? आणि न खेळून आम्ही करावें काय ? दादा एवढे मोठे होते पण क्लबांत गेले म्हणजे चांगले खेळत असत साहेबांच्या बायकांशीं ! पण आम्हीं मात्र खेळावयाचें नाहीं ! —त्यावेळचें मन म्हणे !

भांडणाच्या दुसऱ्या दिवशीं मला वाटलें.—देवानें तिला मुलगाच कां केलें नाहीं ? मुलगीच कां केलें ? आणि तिला देखील तसेंच कांहींतरी वाटत असावें. पण देव देव्हाऱ्यांत असतात—परवांच मी बोलून गेलों होतों.

मी चिडून गेलों. आम्हीं कां खेळूं नये ? मग उपयोग काय ? माझ्या खेळांत सामील न होणारी ही मुलगी कोण ? माझ्यापेक्षां कांहीं निराळी जात आहे का ?

हीच ! अगदीं हीच विचारसरणी मला त्यावेळीं त्रास देऊं लागली. पुढें दोन-तीन दिवसांनीं आईनेंच मला तिच्याशीं खेळावयास परवानगी दिली व मी देखील आढेवेढे घेतले नाहींत.

पण राहून राहून मला वाटे, आपण मोठे झालों काय ?

आणि मोठे झालों म्हणजे काय झालें व मुलींत कां खेळूं नये ? तिलाहि तसेंच वाटत असावें; कारण तिचे डोळेच सांगत असत !

चिमुकल्या डोक्यांत ब्रह्माचेंहि काहूर माजतें. "हें असें कां ?"– तीनतीनदां मी आपले मनास हा प्रश्न विचारीत असें.

शिवाशिवीचा खेळ खेळतांना डोळे झांकून तिला हुडकून काढण्यांत मला समाधान वाटे.

—पण–! मोकळ्या मनानें तिच्याशीं खेळणें बरें नाहीं; कारण तिची भूमिका वेगळी—! !

भावलीचा खेळ खेळतांना मला प्रत्येक कामांत भागीदार करून घेणें तिला अवश्य वाटे व त्याशिवाय तिचें अडून बसे.

—पण ! " मोकळ्या मनानें त्याच्याशीं खेळणें बरें नाहीं, कारण त्याची भूमिका वेगळी —!"

—म्हणजे ती मुलगी आहे असें मला वाटूं लागलें ! !

—व मी मुलगा आहें असें तिला वाटूं लागलें ! !

—आणि त्यांत पुष्कळ अर्थ भरला होता ! !

आतां मला असें वाटतें कीं, इतक्या लवकर आम्हांला या गोष्टी कळावयास – नव्हे कळवावयास – नको होत्या. मुलगा म्हणजे कोण ? अन् मुलगी म्हणजे कोण ?

आपल्या मुलीला आपण धाक घातला होता हें तिची आई विसरली—माझे दादा देखील विसरले.

—अन् आम्ही ?

पुढें आमच्या खेळाचें स्वरूप बदललें. आम्ही काय खेळत असूं हें उगीच सांगत बसत नाहीं. पण आम्हांला एकटें खेळणेंच जास्त आवडूं लागलें.

तिची आई कुठें बोलायूबसायला गेली तरी ती जात नसे, उगीच कांहींतरी कारण सांगे.

मला तें इष्टच वाटे.

एके दिवशीं अशींच आम्ही दोघेंहि माडीवरून खालीं उतरलों. दोघांचींहि हृदयें धस्‌धस् उडत होतीं. कावरेबावरे झालों होतों आम्हीं ! भेदरल्या दृष्टीनें तिनें माझ्याकडे पाहिलें व ती हळूच म्हणाली—

" क्षिती ! कुणाला सांगूं नकोस बरं, शपथ आहे तुला माझी ! "

" नाहीं ग ! नाहीं सांगणार. अगदीं शपथ ! " मी म्हणालों. या आणभाकेला त्यावेळीं मोठें महत्त्व असतें. घेतलेली शपथ कुणालाच मोडावीशी वाटत नाहीं.

—दुसऱ्यांदा देखील तिनें शपथ घातली.

—आमचे खेळ कुणालाच कळले नाहींत........!!

ह्या आमच्या खेळांनीं आमच्यांत अंतर उत्पन्न केलें व परवां ती माझ्याशीं नीट बोलली नाहीं. तिच्या कपाळावर आंठी पडली,

दृष्टींत भीति उत्पन्न झाली व उगीच तिचे ओंठ हललेसे वाटले– " कुणाला सांगूं नकोस बरं ! "

तिची आई किंवा माझे दादा ! त्यावेळीं त्यांना ह्या गोष्टी कळल्या तर आमची पाठ चांगलीच नरम झाली असती. कारण हा दोष आमच्यावर व ते—! पूर्ण निर्दोषी !!

पण आतां काय ! आतां माझ्या हातीं काय आहे ? सुखाची आशा प्रत्येकाला असते हं खरें आणि गेलेलें सुख पुन्हां परत येत नाहीं हें पण तितकेंच खरें. परंतु त्याची आठदण असते ना ? व तिच्यामुळेंच बरें वाटतें—

—आमच्या सुखाच्या आठवणी देखील गिळल्या गेल्या होत्या ! पण कुणीं ?

कधीं कधीं अशा विचारांचें डोक्यांत काहूर माजतें व डोळ्या-समोर ती उभी राहते. तिच्या कपाळावरची आंठी दोरखंडा-सारखी दिसते एकाया ! तिचे ओठ थरथरलेसे वाटतात व मला उगीच शब्द ऐकूं येतात—

"कुणाला सांगूं नकोस बरं ! स्वतःची आढ्यता मिरविण्यासाठीं माझा विनाकारण बळी घेऊं नकोस. मला जगायचं आहे. क्षिति ! सांगूं नकोस, शपथ आहे तुला. "

ती आकृति नाहींशी होते ! कशानें तरी काहूरलेलें डोकें सुन्न पडतें...!!

आतां वाटतें पुन्हां एकदां तिची भेट घ्यावी. एकटी असतांना तिची खात्री करून द्यावी व भीतीचा लवलेश न ठेवतां आयुष्याची हयात गुजरण्यास तिला सांगावें. आपण दोघेंहि निरपराधी आहोंत हें तिला समजावून द्यावें व गतसुखाच्या गोड स्मृती पुन्हां जागृत कराव्यात—

पण आतां काय ? समजा मी पुन्हां तिला भेटलों आणि तिची दृष्टि तशीच असली तर ? तिचे ओठ तसेच थरथरले तर ? तर मला काय वाटेल ? मी इतरांसारखाच एक असेन—परिस्थितीनें माझी सात्त्विकता मारली असेल असा तिचा समज झालेला पाहून मला वाईट वाटेल, दुःख होईल ! !

* * *

दोन वर्षांपूर्वीं पाहिलेली तिची आकृति माझ्यासमोर नीटशी येत नाहीं. मी तसा प्रयत्न केला कीं कपाळीं बांधलेला दोरखंडच तेवढा स्पष्टपणें दिसतो.

लहानपणींची "ती" मला चांगली आठवते—! त्यावेळीं ती फार चांगली होती. ती चुरचुर बोलत असे, दुडुदुडु धांवत असे, खुदुखुदु हंसत असे. ती फार हुशार निघाली असेल, फार सालस निपजली असेल, आतां एका व्यक्तीच्या आयुष्याला तिनें उजाळा आणला असेल—

पण त्याच व्यक्तीकरितां—तिच्या संशयप्रवृत्त मनोभावाकरितां तिला...! !

मला आतां जसें वाटतें तसेंच तिलाहि वाटत असेल! मी जसा कावरा-बावरा होतों तशीच तीहि होत असेल! मी अपराधी नसतांना माझें सात्त्विक सुख नाहींसें झाल्याबद्दल मला जशी चीड येते, तशीच तिलाहि येत असेल. पण आतां काय?

अकारण येणाऱ्या आंसवांना हातरुमालावर झेलून दृष्टि साफ झाल्यावर मी तिला एवढेंच लिहूं शकेन कीं—

" तूं कुठेंहि असलीस तरी सुखी रहा, गतायुष्याची उजळणी करतांना तुला माझी आठवण झाली कीं तूं भेदरून जाऊं नकोस. तूं चांगली होतीस व आतां पण असशील!—आणि माझ्यांत देखील कशाचाच बदल झाला नाहीं!

कधीं काळीं तुला माझे हे चार शब्द वाचावयास मिळाले व ते तूं वाचलेस तर एवढें समजून जा कीं ते लिहितांना माझा हातरुमाल भिजला आहे. तो कां भिजला हें कसें सांगूं?

एकादवेळीं अचानक तुझी माझी भेट झाली तर बालपणीं तुझ्या बावरलेल्या मुद्रेकडे पाहून वाहिलेली आणभाक जन्मभर मोडायचा नाहीं!!

ता. १६—१२—३३.

— १४ —

# अंतरंग

तसें सहसा कधीं व्हायचें नाहीं, पण झालेंच तर—म्हणजे कुणा नवख्या माणसाला तें टेबल तशा स्थितींत दिसलेंच तर—तो म्हणेल, " काय पोरकट आहे " ! आणि दुसऱ्याची गोष्ट जरा बाजूला असूं द्या; पण परवां माईनें देखील असें म्हटलेंच कीं !

स्वतःचें काम संपवून पदराला हात पुशीत ती माझ्याकडे आली. मी कांहींतरी लिहीत होतों. मला त्रास देऊं नये म्हणून हळूच टेबलावर हात ठेऊन ती माझें लिखाण वाचूं लागली —' एकदां जी संवय लागली ती तोडावयास अत्यंत सायास पडतात '—

" माई ! मला हें लिहूं दे बरं कां, उद्यांच्या नोटस् आहेत ह्या."

" बरं, किती वेळांत लिहून होईल रे तुझं–" तिनें घाईनें विचारलें.

" अग पांच दहा मिनिटांत—तूं जाऊं नकोस मात्र. " मीं खालीं दृष्टि वळविली.

" मी काकूकडे आहे, हांक मार मला—" ती जावयास निघाली. तिनें हात उचलले तोंच तिच्या त्या ओलसर स्वच्छ हातावर शाईच्या वेड्यावांकड्या रेषा उमटल्या.

" इश्श ! बापू, हें रे काय ! किती घाणेरडं झालं आहे टेबल हें ! अन् हा तुझा पोरकटपणा जाणार कधीं ? किती लिहून ठेवलंस पण ! ! एकदां तें धुवून तरी काढ– कीं मी देऊं धुवून ! "

" तूं अगोदर इथून चालती हो. पांच मिनिटांत हांक मारतों तुला मी. " मी लिहूं लागलों. माई म्हणजे माझ्याबरोबरच खेळलेली. तिनें चटकन् तो ओलसर भरलेला हात माझ्या गालावर दाबला आणि हंसत हंसत ती घरांत पळाली—

—आणि खरोखर ही संवय वाईट नाहीं का ? कांहींहि, कसेंहि त्या टेबलावर लिहून ठेवायचें हें अजूनहि मला शोभतें का ? परवांचें माईचें तें वाक्य—" एकदां तें नीट धुवून तरी काढ, कीं मी देऊं धुवून—" तेंच मी तितक्यांतल्या तितक्यांत पांच सातदां लिहून काढलें होतें ! पण तें टेबल मात्र धुतलें नाहीं. काय असेल तें असो ! !

पुष्कळदां असें होतें. लिहितांना मध्येंच लेखणी अडते आणि मी विचार करूं लागतों. सहज टेबलावर नजर जाते. आणि मग मी कशाबद्दल विचार करीत होतों याचें भानच राहत नाहीं. आकृती, अस्पष्ट आंकडे, शब्द वगैरेकडे माझें मन ओढलें जातें

—कारण त्यांपैकीं प्रत्येकाला अर्थ असतो. ' मग तो कोणताहि असेना—

—माईचें तर नांव कित्येक वेळां लिहिलें असेल मीं ! आणि ती सुकलेली चांदणी ! इतरांना तो एक शाईचा डाग दिसेल, पण मला तो तसा दिसेल का ? अंह ! कितीतरी अर्थ भरला आहे त्यांत ! ! माईची सारी जीवनकथा त्यांत दिसते मला—आणि त्या चांदणीकडे पाहून हजारदां ओल्या हृदयानें मी माईबद्दल विचार केलेहि—

एकाच ठिकाणीं खेळलों आम्ही. आमच्या दोघांच्याहि आयुष्याच्या दिशा कशा उजळल्या गेल्या ! ! पुष्कळदां मला मोठें आश्चर्य वाटतें. माझें नाहीं मोठेंसें, पण माई—?

वाऱ्याच्या झुळकीबरोबर माईचे केंस उडत होते आणि ती सुखानें झोंपली होती. एका रात्रीं प्रभाकरानें तिचा हात धरला व झोंपेनें भारावलेल्या तिला नकळत तो भलत्याच वाटेनें घेऊन गेला. ती जागी झाली आणि एकंदर सर्व प्रकार तिला जाणवला. तेव्हां त्यानें दाखविलेल्या मार्गानेंच आणि त्याचाच हात धरून जाणें तिला भाग पडलें !

घराच्या दक्षिणेस खिडकींतून एक उंच उंच टेकडी खूब खूब दूर दिसत असे. इवलीशी माई मला नेहमीं म्हणे—"मी किनई, एक दिवस त्या टेकडीवर चढून जाणार आहें." पण आतां

माईचा मार्ग निराळा फुटला होता आणि त्याच्या शेवटीं ती टेकडी नव्हती ! !

भरली घागर डोक्यावर घेऊन आलेल्या माईच्या हातचा शिंतोडासुद्धां प्रभाकरच्या आईनें सहन केला नाहीं, मग पाणी पिणें तर दूरच ! आपल्या रस्त्यानें जाणाऱ्या आयाबाया माईकडे बघूं लागल्या तरी माई प्रभाकरच्याच पायाकडे पाहून चालूं लागली. पण प्रभाकरला तरी त्या रस्त्याची नीट माहिती होती का ? दिवस होता तोंपर्यंत उजेडांत त्याला पाऊलें उचलतां आलीं. पण अंधाऱ्या रात्रीं तो अडखळूं लागला. रस्ता विचारावा तर माईशिवाय दुसरा कोणी दिसेना. तो चिडून गेला, संतापला आणि माईला सुख पारखें झालें ! ! !

मी कितीहि समाधान केलें तरी घातल्या पाण्यानें कुठें पीक येतें का ? ती जेव्हां जेव्हां माझ्याकडे येई ( आणि इथें होती तोंपर्यंत ती रोज येत असे ) तेव्हां तेव्हां मी तिला हंसत खेळत घरीं पाठवीत असें. ती नेहमीं म्हणे—" बापू ! तूं तरी आतां दूर जाऊं नकोस " तिच्या किंवा माझ्या इच्छाआकांक्षा पूर्ण करणारी एक प्रबल शक्ति असल्याची जाणीव मला असल्यामुळें मी नुसतें—" नाहीं ग ! " म्हणून स्वस्थ बसे. ती गेल्यावर मन उगीच हांका मारीत सुटे—" माई, माई ग ! "

एक दिवस मी पेरू आणायला गेलों. सकाळची वेळ. पेरूवाला मला सुंदर सुंदर पेरू दाखवूं लागला. इतक्यांत माझ्याच

बाजूला असलेला एक मध्यम वयाचा गृहस्थ म्हणाला,—" अहो, तो पेरू नका घेऊं, पक्षानें टोंचला आहे. "

" मग त्याला काय हरकत आहे. आज सकाळींच तोडला हो दादा झाडाचा, " पेरूवाला बोलला. मला काय वाटलें कुणास ठाऊक; पण मीं तो पेरू मुद्दाम घेतला. घरीं आणतांच आई म्हणाली–" बापू , अरे हा टोंचलेला आहे. कशाला आणलास–? "

"मग झालं काय ? सबंध पेरू खराब आहे का ? " मी तो पेरू घेऊन चिरूं लागलों, इतक्यांत माई ताकाचें भांडें घेऊन आली—" माइटले अशी वेळ साधून येत जा. मी तुला बोला-वणं पाठविलं नव्हतं. "

" काकू, पहा ग कसा बोलतोय तो—"

" काकू काय पाहते ? माझ्यांत असं पाहण्यासारखं काय आहे ? तुझ्यांत आहे तसं बरं ? अगदीं या पेरूसारखी पिंवळी दिसते आहेस माई तूं—"

तिनें त्या पेरूकडे पाहिलें. ती हंसली नाहीं. मी चपापलों. आज माई खिन्न कां झाली ? आणि त्याला माझ्याकडून कारण मिळालें का ?—मला चुकचुक वाटूं लागली ! !

संध्याकाळीं मन रमावें म्हणून " सदाफुली " हातीं घेतली. शेवटचें राहिलेलें प्रकरण मी वाचूं लागलों. डावा दंड मी टेब-लाला टेंकला होता आणि हाताचीं बोटें केंसाशीं खेळत होतीं.

शेवटीं शेवटीं फारच बहारीचें वर्णन होतें—" अशोकानें तिमाला हृदयाशीं वट्ट धरलें होतें. तो तिचें चुंबन घेण्यांत मग्न झाला होता. माझी चाहुल लागतांच अशोक ओशाळला. किती स्वाभाविक होतें तें ओशाळणें ! !......तो प्रेमभरानें जिवाचे सारे भाव एकवटून चुंबन घेत होता. तिमा अगदीं अचल व स्तब्ध होती..... " शेवटचा शब्द वाचून मी भानावर आलों. माई माझ्यामागें उभी होती. " काय ग ? "

तिनें उत्तर दिलें नाहीं. मी तिच्याकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांतून दोन अश्रुबिंदू गळाले आणि त्यांपैकीं एक टपकन् त्या टेबलावर वाजला—

आज सकाळच्या प्रसंगापासूनच माईचा पदर ओला झाला होता. मी उगाच बसलों. मलाहि तिच्यासारखेंच करावेंसें वाटलें. तिला हंसत खेळत घरीं पाठवावयाची, हा माझा निश्चय मला आठवला. मी हंसत म्हणालों—

" माई, हें काय ? असं करावं का ? माझ्यावर रागावलीस का ? "

" बापू—"

" मग तुला झालं काय, सांगायचं नाहीं का ?"

" मला काय झालं हें त्या अश्रूला विचार."

काय बोलावें हें मला सुचेना. मी पुनः बळेंच हंसलों.—

" तो म्हणतो आहे कीं, माई उगाच रडते आहे. ती इतकी सुंदर आहे, इतकी बोलकी आहे—"

" होय आणि इतकी सुखी आहे–"ती चिडून म्हणाली. तिला सारें अनावर झालें होतें.

" खरंच तसंच म्हणतो आहे तो ! सुख मानून घ्यायचं असतं माई ! कसल्या सुखाच्या आणि प्रेमाच्या कल्पना उरीं बाळगून बसली आहेस तूं ! मानलं तर प्रेम. दुसरं काय ! माझा तर नाहीं या प्रेमावर विश्वास—"

" अगदीं खरं बोलतो आहेस बापू तूं ? "

" हो, खरंच " मी बळजबरीनें उत्तर दिलें.

" बरं—" मला यानंतर दुसरें तिसरें बोलतां येणें शक्यच नव्हतें. पानें भिजूं नयेत म्हणून मी " सदाफुली " बाजूला सारली आणि आवाज ओढून म्हणालों—

" माई, निदान माझ्याकरितां तरी तूं उगी राहीनास, परवां काय कबूल केलें होतें तूं—"

"तूं मला नेहमींच समाधान देत आला आहेस. अंधाऱ्या रात्रीं कुठें जावें हें मला समजेना. मी ओरडूं लागलें. तूं तिथें असतास तर— ' माई, एकदां मोठ्यानें हांस पाहूं. म्हणजे तुझा मार्ग तेजाळून तुला आपोआप वाट दिसेल—' असं म्हणाला असतास. मी निजलें होतें ......."

माईनें सांगितलें तें खरें होतें. मी तिला तसेंच सांगितलें असतें. आम्ही सर्व इथें केव्हां आलों हें माहित नाहीं, केव्हां जाणार हें निश्चित ठरलेलें नाहीं, काय करावें आणि कां करावें हें देखील कुणी सांगूं शकत नाहीं. मग मिळालेली भूमिका उजळ करून दाखविण्यांतच आपलें वैशिष्टय आणि व्यक्तित्व नाहीं का ? आपल्या रडण्यानें दुसऱ्याला त्रास द्या कशाला ! !—

बराच वेळ थांबून मी माईला घरीं पोंचवून आलों. परत आलों तों टेबलावरचा अश्रुबिंदु सुकून गेला होता. मी त्याकडे किती वेळ पाहत बसलों ! नंतर नकळत एकाद्या यंत्राप्रमाणें माझ्या हातानें तिथें एक चांदणी काढून ठेवली ! !

पण मी ती कशाकरितां काढली ? माझा प्रेमावर विश्वास नाहीं ना ? मग माईबद्दल एवढें कां वाटावें ? तिच्या परिस्थितीमुळें ? पण माझ्यासारखेंच इतरांना कां वाटूं नये ? आणि पुष्कळदां आजपर्यंत कशाकरितां माझे डोळे ओले झाले आहेत ?

परंतु ज्या गोष्टी पटतात त्या सर्वच आपण दुसऱ्याला सांगत असतों का ? आणि तसें न केलें तरी जो परिणाम व्हायचा तो टळतो का ?

मी किती वेळां त्या चांदणीकडे शून्य दृष्टीनें पाहत होतों. तिच्या शेजारींच बत्तिसाचे आंकडे गर्दी करून वेडेवाकडे काढले होते. त्यांत सुद्धां किती गोष्टी भरल्या होत्या ! माझ्या आयुष्यांत या आंकड्यांना अकारण महत्त्व आलें होतें—

२ — मी आणि तो सतत चार वर्षे हातांत हात घालून चालत होतों. त्यावेळीं मैत्रीच्या व्याख्याहि आम्हांला माहित नव्हत्या. कांठच्या पायरीवरून पाण्यावर हळूच फुंकर घातली तरी तरंग-लहरी दुसऱ्या तीरापर्यंत जाऊन पोंचत असत हें आम्ही पाहत होतों—अनुभवीत होतों.

त्या जगांत सौंदर्य होतें. उपवन होतें तें एक! त्यांत फुलें होतीं, फुलपांखरें होतीं—आणि सत्य पण होतें! दोन फुलें एकमेकांजवळ येतांना किंवा दोन फुलपांखरें एखाद्या फुला-भोंवतीं बागडतांना त्या फुलाला पूर्वी कीड लागली नव्हती हें पाहून घ्यावें लागे.

तेवढ्या अवधींत आम्ही फारच कमी वेळ बोललों. आम्हांला बोलावयास कांहींच नव्हतें—आणि बोलावयाचें तरी कशा-करितां? दुसऱ्याच्या हृदयांत आपल्याकरितां किती जागा आहे हें पाहण्याकरितांच ना? तें तर आम्हीं पूर्वींच करून टाकलें होतें. संथ पाण्यावर वारा खेळत असला म्हणजे मन लोभावून जातें. आंत पाणी किती आहे याची जाणीव असली म्हणजे कशा-चीहि भीति न बाळगतां जल–लहरींच्या मनोहर लास्यांत मिसळून जावेंसें वाटतें. पण तीच आंतली खोली माहित नसली म्हणजे मन म्हणतें—आंत काय असेल? किती पाणी असेल? आंत साप असतील का? मला दुःख होईल कीं सुख होईल?....

माझा नेहमींचा नियम. रात्रीं साडेनवाला सहज म्हणून मी

जिना उतरून खालच्या अंगणांत येत असें. त्यानेंहि ती वेळ कधीं चुकूं दिली नाहीं. आम्ही नंतर भेटत असूं. आमच्याकडे पाहवयास त्यावेळीं कुणीहि नसे. तेवढ्या पांच-दहा मिनिटांतच जें होईल तें आमचें बोलणें आणि त्यांतूनहि बराच वेळ एक-मेकांकडे पाहण्यांतच जात असे. पण परततांना आम्हीं किती तरी आनंदित व्हायचें !

मला नीट आठवतें तें ! मी एकदां आजारी होतों. हॉस्टेल-मधील सारी मित्रमंडळी सहानुभूतीनें माझ्या उशापायथ्याशीं बसत–तो कधींच बसला नाहीं. मला विरंगुळा वाटावा म्हणून ते मला कांहीं वाचून दाखवीत–कांहीं गोष्ट सांगत–तसेंहि त्यानें कधीं केलें नाहीं. सहा वाजले कीं सारीं मुलें जेऊन उठत. त्यांच्या अगोदरच पांच मिनिटें तो उठत असे. टॉवेलनें हात पुशीत तो माझ्याजवळ येई. राहिलेलें औषध कपांत ओतून तो मला देत असे. मी औषध घेतांना त्याचे डोळे माझ्या चेहऱ्या-वर खिळलेले असत. माझ्या हातचा कप घेऊन तो मला केविल-वाण्या नजरेनें म्हणे—" बापू ! केव्हां बरा होणार आहेस तूं ! असं काय करतोस रे ? " माझ्या खोलींत मुलें यावयास लागलीं कीं तो चालता होई ! !

आमच्या मैत्रीबद्दल कुणाला हेवादावा वाटला नाहीं; कुणाला त्रास झाला नाहीं; कुणाला मध्यें बिब्बे घालण्याची बुद्धि झाली नाहीं.

एकदां तो माझ्या खोलींत आला. दुसरे दिवशीं त्याची परीक्षा होती; त्यानें पुस्तक उघडलें व एका कवितेवर बोट ठेऊन तो म्हणाला:—" याचा अर्थ सांगतोस का ? " मला आश्चर्य वाटलें. यापूर्वी तो कधींच मला असा भेटला नव्हता. मला आनंद झाला:—

मुग्ध मधुरता चित्तीं घेती – पूर्वी अपुली होती समता ।
गेला गेला काल अहह ! तो – फेर किती आतां ॥

–केशवसुत.

पहिल्या दोन ओळींचा अर्थ मी त्याला चांगला समजावून दिला. शेवटच्या दोन ओळी मात्र मला नीट उमगल्या नव्हत्या. त्या रात्रीं आम्ही बराच वेळ बोलत होतों.

तीन-चार दिवसांनीं मला गांवाला जावयाचें होतें. रात्रीं साडे दहाला गाडी जाणार होती. स्टेशनच्या एका कडेला बऱ्याच अंतरावर आम्ही बसलों होतों. कुणालाच बोलवलें नाहीं– बोलावेंसेंहि वाटलें नाहीं. अखेर ती स्निग्ध शांतता मी मोडली—" परवांचा तुझा पेपर मास्तरांनीं माझ्याकडून तपासून घेतला. आठ मार्क्स् कापून उरलेले बत्तीस मार्क्स् मी तुला दिले आहेत. केशव-सुतांच्या त्या ओळी तूं किती सुंदर लिहिल्या होत्यास ! " मी त्याचा हात जोरानें दाबला —

—त्यानें माझ्याकडे हंसून पाहिलें. तो अगदीं आनंदी दिसला;

जवळून जवळून त्यानें मला विचारलें—" किती मार्क्स् दिलेस तूं मला ? "

" बत्तीस—"

" किती म्हणालास ? "

" बत्तीस. कां ऐकूं येत नाहीं ? "

" नाहीं ! पुनः एकदां सांगून दे. तुझी भेट कशाला—"

तसें म्हणण्याचा त्याचा काय उद्देश होता हें मी समजलों. त्याचे दोनीहि हात माझ्या गळ्याभोंवतीं विळखा घालून होते. त्याच्या दोनीहि गालांवर मी आपले हात दाबले आणि ओठांशीं ओठ भिडविले.

—एकमेकांचा निरोप घेतला आम्हीं. ओठ हलत असतांनाच मी गाडींत बसलों. किती तरी वेळ मला तो आवाज स्पष्टपणें ऐकूं येत होता—

—आणि आतां ? आज तरी मी तो विसरलों का ? तें स्थळ, ती वेळा—!! पण आम्ही मात्र कायमचे दूर झालों आहोंत—यापुढें एकमेकांना भेटणें आमच्या हातीं नाहीं आणि पुनर्जन्मीं ? —पण हें खरें आहे का ?

त्या दिवशीं कवितेचा अर्थ सांगतांना शेवटच्या दोन ओळी मला नीट उमगल्या नव्हत्या, आतां मात्र— पण त्या कुणाला

समजावून द्यावयाच्या? आतां मला पुढच्याहि ओळी बागेंत बसलों म्हणजे गुणगुणल्याशा वाटतात—

सौकुमार्य तव अजुनी आहे–
हंसतचि आहे हास्य तुझें हें।
परि मग भालीं ढग अश्रूंचा,
हाय डंवरलाहे ॥

मी नदीकांठीं एकटा फिरतों. लव्हाळयाशीं खेळणारें पाणी आनंदानें खिदळत पळत असतें. बाजूच्या झाडाच्या डहाळीवर पाखरांची किलबिल ऐकूं येते. पानांच्या देंठावर हळूच मारलेल्या चोंचींचा आवाज देखील ऐकूं येतो मला त्यांच्या! पण —! एके काळीं मला याचा अर्थ कळत होता आणि आतां— आतां वाटतें कांहींच ऐकूं येऊं नये फक्त तेवढाच आवाज ऐकूं यावा– " For all is dark where those are not.

सत्यसृष्टींतील भावलहरी स्वप्नसृष्टींत तरंगतांना दिसतात असें माईनें मला सांगितलें होतें. परंतु रात्रंदिवस ध्यानींमनीं रंगणारी ही गोष्ट माझ्या स्वप्नीं कधींच तरंगली नाहीं. मी त्याकरितां देवाजवळ प्रार्थनासुद्धां केली. तो तरी काय करणार बिचारा! आकाशाच्या पोकळींत त्यालाच गटंगळ्या खाव्या लागतात!!

दुसरा कांहींच आधार नसला म्हणजे पाण्यावर तरंगणारे पानच आपण हातीं धरतों. त्या बत्तिसाच्या आंकड्यानें मला

तेवढें—नव्हे, त्यापेक्षां शतपटीनें जास्त समाधान मिळतें. तीन आणि दोन यांची ही संगति माझ्या डोळ्यांसमोर उभी राहिली कीं त्यांतून निराळाच आवाज ऐकूं येतो व त्यांतच रंगून जावेंसें वाटतें. वेडे हात उगीचच चाळे करीत असतात आणि टेबलावर अक्षरें उमटत असतात—बत्तीस ! बत्तीस ! ! ... ! ! !

तशीच हो शकूनची आठवण ! एक दिवसहि असा गेला नाहीं कीं ज्या दिवशीं मला शकूनची आठवण झाली नाहीं. मी असे-पर्यंत तिला सावलींत बसवावयाचें असा माझा निश्चय आहे. तिला कशाला त्रास ! परिस्थिति ? पण तिला काय त्याचें ? मी कशाकरितां आहे ? वाघिणीशीं झुंज खेळायला कोकिळेला कुणी नेत असतात का ? आणि तसें केलें म्हणजे तिकडून दमून–दव-डून आल्यावर आंब्याच्या डहाळीवर बसून गाईल कोण ! माझी शकून ! किती जपतों आहे मी तिला—! !

परवांच्या सुटींत तिला चार दिवस मी इथें आणलें होतें. तिच्यांत कांहींहि बदल झाला नव्हता. ती आली ती माझ्याच ताटांत बसून जेवली. मी कालवून दिलेलाच भात तिला आव-डला–माझ्या तोंडांतलीच सुपारी चिमणीसारखी काढून घेण्यांत तिला सुख वाटलें ! माझी शकून ! किती–किती गोड पोरगी आहे ! !

तिला मी हौसेनें सिनेमाला घेऊन गेलों परवां. तिला फार आवडला तो सिनेमा – कृष्णानें मथुरेला जातेवेळीं परत यायचें

राधेला वचन दिलें होतें. पण तो आला नाहीं. मधुवनांतील झाडांखालीं, नदीच्या खळखळींत, पक्ष्यांच्या कूजनांत तिला बिचारीला तोच आवाज ऐकूं येत होता—" हां राधे, जरूर आऊं गा –होय राधे, जरूर येईन "—

—राधेच्या पतिदेवानें तिच्यावर संशय घेतला व तिला मारण्यास त्यानें काठी उचलली ! कृष्णानें त्याला त्यावेळीं आपल्या उज्ज्वल प्रेमाची साक्ष पटवून दिली–"मोहन राधा है, राधा मोहन है, जिन्हे आखे है, वे देख सकते है,"—अगदीं हें सारें सारें परत येतांना शकूननें मला म्हणून दाखविलें होतें—

त्या रात्रीं जेऊन चांदण्यांत पडल्यावर केंस बाजूला सारीत ती म्हणाली—" राधा किती सुंदर नाचते रे ! मला शिकविशील तसा टिपऱ्यांचा नाच ? "

" हो, शिकवीन बरं शके."

" आणि मग आपण दोघेंहि नाचूं."

"तेंहि कबूल—" आणि याची कबुली घेतल्यावर ती झोंपली. किती – निर्मल असतें बालिकांचें मन ! ! ती कितीहि मोठी झाली तरी तशीच राहिली पाहिजे; तिचे गाल तसेच गुलाबी असले पाहिजेत; तिच्या ओंठांच्या पाकळ्या तशाच नेहमीं खुलल्या पाहिजेत; तिचे डोळे असेच लाडके राहिले पाहिजेत आणि नेहमीं तिनें असेंच म्हटलें पाहिजे—"बापू ! मग आपण खूब खूब नाचूं ! " एवढें झालें कीं पुरे. बाकी मी आहेच सर्व गोष्टीकरितां !

आणि काका तरी तेंच सांगून गेले मला. त्यांनीं आम्हांला तसेंच वागविलें ना? माझा परिक्षेंत पहिला नंबर आला होता म्हणून मुद्दाम अडचण सोसून त्या महिन्यांत त्यांनीं तें टेबल घेऊन दिलें होतें. किती तरी हौस वाटली मला नि त्यांना! कसा विसरेन मी सारें?

काका इतके आजारी होते. दहा दहा मिनिटांनीं बेशुद्ध पडत, पण शेवटपर्यंत ते माझ्याशीं बोलले–" दुसऱ्याच्या फंदांत पडायचं नाहीं. आपल्याला काय वाटेल तें करायचं, चूक झाली तरी ती आपणच सुधारायची"—कितीतरी सांगितलें त्यांनीं मला आणि शेवटीं त्या काळघटकेच्या अखेरच्या सेकंदालाहि त्यांचा आत्मा मला जातां जातां सांगून गेला:—"बापू! ऐकावं जनाचं, करावं मनाचं"—!!

काकांच्या देहाला मी स्वतःच अग्नि दिला. अग्नीच्या एकेका ज्वालेबरोबर त्यांच्या आशा, निराशा, सुखदुःखें जळून गेलीं; काकाहि राखेंत मिसळले. पण त्यांची स्मृति ?—रोज टेबलावर येऊन बसलों म्हणजे आठवतें मला—त्यांनीं किती प्रेमानें आम्हांला पंखाखालीं धरलें—शकूनकरितां मी काय वाटेल तें करीन—!!

आणखी कितीतरी लिहिलें आहे इथें! कित्ती कित्ती म्हणून सांगूं! ढगाआड लपलेल्या चांदण्या लुकलुकतांना दिसल्या म्हणजे जसें वाटतें तसेंच मला इथें वाटतें–भोंवतालची रडारड मला

ऐकूं येत नाहीं—माईला मी हंसायला सांगितलें होतें तेच शब्द ऐकूं येतात! तापलेल्या वाळूंतून प्रवास करतांना मला चटके बसत नाहींत—मागच्या मुक्कामीं अनुभवलेल्या स्निग्धमुग्ध सुखाच्या कल्पनेच्या हिंदोळीं हेलकावतच मी पावलें उचलतों! पुढचा मार्ग दिसला नाहीं तरी मी भेदरून जात नाहीं, आशा सोडीत नाहीं. कारण कोणते तरी गाल मला नेहमीं गुलाबी ठेवायचे आहेत; कोणत्या तरी ज्योती मला तेवत ठेवायच्या आहेत याची मला नेहमीं जाणीव असते, आणि म्हणूनच मी कुणाचें न ऐकतां स्वतःला गवसेल त्या मार्गानें पुढें पुढें जात असतों.

माईप्रमाणें आईसुद्धां बरेच वेळां मला म्हणाली होती–" दे ना रे तें टेबल एकदां नीट करायला! भारीच आळशी—"

तिला कसें समजावून देऊं हा माझा आळस नाहीं म्हणून! बिचारी आई!! जगाच्या धक्काधक्कींत चाळीस बेचाळीस वर्षें गमावून बसली आहे ती. तिला कल्पना देखील करतां येणार नाहीं आतां या वयांत. अगदीं साधीच गोष्ट–मी रोज सकाळीं बागेंतून फुलें आणतों; पण पूर्वीसारखा एकदां तरी तिनें सुवास घेतला किंवा एकादें फूल सुंदर आहे असें तिला वाटल्याचें मला आठवत नाहीं. ती निमूटपणें देवावर वाहत असते तीं फुलें!

माझ्या टेबलाची सध्यां मलाच फार किंमत आहे. तें मोडकें आहे का? असूं द्या. तें घाणेरडें आहे का? कबूल! पण मी

तिथें गेलों म्हणजे मला त्या कल्पना देखील शिवत नाहींत, उलट तहानेनें व्याकुळ झालेला जीव सुखावतो. कशाची तरी लागलेली भूक शांत होते—

—आणि इतरांनासुद्धां काय त्रास आहे ? माझ्याकडे कुणीहि भेटायला बोलायला आलें म्हणजे त्यांना त्या टेबलावर जाडसा एक कागद अंथरलेला दिसतो—कल्पनाहि येत नाहीं त्यांच्या मनांत कांहीं. जेव्हां जेव्हां मी कामांत गढलेला असतों – जगाशीं संबंध ठेवीत असतों – तेव्हां तेव्हां त्यावर कागदच झांकून ठेवतों, पण माझ्या निवांत वेळीं–शांततेच्या, विश्रांतीच्या वेळीं– मी तो कागद हळूच बाजूला केला म्हणजे...... ! !

—आणि हें सुख सध्यांतरी नाहींसें करून टाकावयाची माझी तयारी नाहीं. शिवाय ज्या वस्तूपासून इतरांना कोणत्याच प्रकारचा संपर्क पोंचत नाहीं ती तशीच राहिली म्हणून त्यांना उगीच हें कां वाटावें ?

ता. ४-४-३४.

---

— १५ —

# "वास्तुदेवता"

"एक तुतारी द्या मज लागुनी

कुणा बिचाऱ्याची उमेद व आशा तेवत होती कोण जाणे! माझी मनःस्थिति मात्र ती ओळ समजून घेण्याची किंवा गुण-गुणण्याची नव्हती!

थिजून गेलों होतों मी. इतकें सारें जुळवून आणलें, सुक्या-बरोबर ओलें जळलें त्याचीहि पर्वा केली नाहीं. एकदां हें संपूं द्या, पाहून घेऊं पुढें – याच भरंवशावर सर्व गोष्टी केल्या – पण काय ?—

मनुष्यस्वभावाचे बरेवाईट अनुभव मला आले होते; परंतु आपल्या स्वार्थाची जिथें मुळींच आशा नाहीं अशा गोष्टींतहि बिब्बे घालण्याच्या प्रवृत्तीमागें काय असावें याचा अंदाज मला होईना. हा देखील एक स्वभावच ! !

मी बिछान्यावर पडलों. रात्रीं दहाचा सुमार असेल. झोंप येणें शक्य नव्हतें. यापुढें आतां झोंपाच काढावयाच्या होत्या निवांत ठिकाणीं—! भलभलते विचार मनांत येत....

चांदण्यांत बरें वाटेल ही आशा म्हणून बाहेर पडलों. पौर्णिमा होती ती. जिकडे तिकडे लख्ख प्रकाश पडला होता. दाराबाहेर पाऊल ठेवतांच घरासमोरच्या त्या अजस्र पिंपळाखालीं हृदय कोंदाटून टाकणारा अंधार पडला होता. आतां बरें वाटणार होतें ! विचारांची सांखळी नीट जुळविली व मी चंद्राकडे पाहूं लागलों.

चंद्रलोकावरच्या साऱ्या कळ्या उमलल्या होत्या व त्या शीतल सुषमेनें चराचर सृष्टि दूध शिंपडल्यासारखी शुभ्र आणि सौम्य दिसत होती. पृथ्वीवर चंद्रिका जणुं कणाकणानें सांडते आहे असा भास होई व ते तुषार अंगावर उडून सर्वांग पुलकित होई. मनांतील सुप्त संवेदना छेडल्या जात होत्या.

सुधासिक्त भासणाऱ्या रस्त्यावर मधून मधून एकादे ठिकाणीं झाडांच्या काळ्या सांवळ्या लांबवर पसरलेल्या दिसत. तेवढेच ते काळे भाग बाकीच्या फेनील प्रकाशांत इतके विलीन होत कीं त्यांच्याकडे नजर जातांच गंगायमुनेच्या शुभ्र–शबल संगमाची चटकन् आठवण होई.

आपल्या तंद्रींत मी चालत होतों. ‘ वॉकररोड ’ केव्हां संपला हें मला कळलें देखील नाहीं. आणि पाण्यावरून आलेल्या वाऱ्याचा गारवा व पानलव्हाळीचा वास जर मला आला नसता तर ‘ शुक्रवार तलाव ’ नुसताच चांदीनें भरल्यासारखा मला वाटला असता—किती शांत होतें सारें वातावरण ! !

तलावाच्या भोंवतालीं मी कितीतरी वेळ फिरलों. फिरून कंटाळलों देखील. कुणाला सांगावयाच्या ह्या गोष्टी ?–आणि मनांत तरी काय व कसें ठेवायचें ! ! झगझगीत प्रकाशांत बसावेसें वाटेना. आणि बसणार तरी कुठें ?—तलावाच्या दक्षिण बाजूला ' **गणपतीच्या बुरुजा** 'वर मी जाऊन बसलों. विचारांच्या धाग्यादोऱ्यांची वीण सुरू झाली. खरंच आमच्या हातून कांहींच होणार नाहीं काय ?—ह्या प्रश्नानें माझा जीव सारखा दुखत होता. चंद्राकडे कितीहि पाहिलें तरी डोळे थोडेच निवणार होते ? ते तसेच मिटले आणि पडलों स्वस्थ !

झोंपेची अर्धवट झांपड माझ्या डोळ्यांवर असेल. डोळ्यांसमोर उभीं राहणारीं चित्रें पाहण्यापेक्षां दुसऱ्या कशावरहि अवधान ठेवणें मला अशक्य झालें असावें. वाऱ्याचा स्पर्श झाला कीं उघडलेले डोळे मिटावेसे वाटत – तेवढेंच सुख ! !

दक्षिणेच्या बाजूनें ' **निधाम पार्क** 'च्या अलिकडील झाडांची पडछाया पाण्यावर तरंगत होती. मधूनच चंद्राचे कवडसे नाचत; पाण्यावरून वारा भिरभिरला कीं तेवढेंच पाणी वर येई;—इवलीशीच लाट उसळे आणि पाण्याचा तेवढाच फुगीर भाग चमकूं लागे. गान-लुब्ध फणींद्रानें आनंदाच्या तंद्रींत आपल्या वेटोळ्या वळवळाण्यात व त्याच्या सतेज कांतीमधून प्रकाश परावर्तित झाल्यासारखा वाटावा– तसें दिसत होतें सारें तें !

कसला तरी सौम्य प्रकाश पडला. शेषाच्या मस्तकावरील

मणि चमकत असावा असें मला प्रथम वाटलें. तो रक्तिमा वाढतच गेला. त्यांतून अस्पष्ट अशी आकृति दिसूं लागली. कमलासना लक्ष्मी प्रगट झाली कीं काय ? ह्या शंकेनें मी अनिमिष नेत्रांनीं त्या बाजूला पाहत राहिलों.

पुष्परागासारखी सुकुमार दिसणारी ती आकृति आतां साकार दिसूं लागली. तरंगाचा झोका मिळाला म्हणजे ज्या विलोल गतीनें राजहंस पुढें सरावा – तसल्याच विलोल गतीनें ती आकृति हळूहळू समोर येऊं लागली.

तिनें हिमधवल वस्त्र परिधान केलें होतें. तिचे केस अनिर्बंधपणें वाऱ्यानें उडत होते. तिच्या मुखावर उदासवाणी सावली समावली होती. पाण्यांतून बाहेर येऊनहि ना तिचें वस्त्र भिजलें कीं केस निथळले. वक्षःस्थळाचा भाग तेवढा ओलाचिंब झालेला दिसत होता. ती आणखी जवळ आली. तिच्या डोळ्यांतून आंसवें गळत होतीं व तीं तिच्या कपोलावरून वक्षःस्थळावर झिरपत होतीं.

ती कोण असावी हें विचारण्याचें धैर्य मला झालें नाहीं. तिच्या प्रत्येक कृतीवर माझें अवधान खिळलें होतें. हळूंच तिनें मला खूण केली – माझ्या तोंडून अस्पष्ट असा प्रश्न फुटला—

"मी नागपूरच्या भोसल्यांची 'वास्तुदेवता'–" एवढेंच बोलून ती थांबली. दुसरा प्रश्न विचारण्याचें माझ्या मनांत आलें; मीं विचारला मात्र नाहीं.

"माझें वसतिस्थान हेंच. भोंसल्यांची सर्व संपत्ति ह्या 'शुक्रसरां'त सांठवून ठेवलेली आहे. आज पुनवेचा दिवस माझी फेरीची वेळ आहे. चल बाळ, मध्यरात्र उलटलेली आहे. उशीर होईल आपल्याला परत यायला—"

तिनें माझ्या खांद्यावर हात ठेवला. आणि पाण्यांतून वर येऊन ती चालूं लागली. 'टिळक पुतळ्या'जवळ येतांच थांबली ती थोडा वेळ ! आणि एक दृष्टिक्षेप करून तिनें पाय उचलला. मराठ्यांच्या पडत्या काळांत 'नागपूरचा किल्ला' हस्तगत व्हावा म्हणून दरवाज्यावर हल्ला करावयास इंग्रज सेनापतीनें याच जागेवर मोर्चे बांधले होते. व इथूनच दरवाज्यावर तोफा डागल्या होत्या. याची तर तिला आठवण झाली नसेल ना ? 'शुक्रवार दरवाज्या'पर्यंतच्या रस्त्यावर तिची नजर खिळली होती. ज्या रस्त्यावर दरवाज्याचें रक्षण करण्यासाठीं खंद्या अरबांच्या घरांची रांग पसरली होती, त्याच रस्त्यावर आज चार दोन भटारखाने, एक दोन चोळ्या–पातळांचीं दुकानें, मध्येंच असणारें चांभाराचें दुकान, हें पाहून तिला काय वाटलें असेल ? मी तिच्याकडे पाहिलें. तिचें कुठेंच लक्ष नव्हतें. ती 'शुक्रवार दरवाजा'-च्या वरील भागाकडे पाहत होती. तोफेच्या भडिमारालाहि दाद न देणारा तो दरवाजा आज तिला काय सांगत असेल ? दानवाशीं चाललेल्या युद्धसत्रांत असुरांच्या शस्त्रांनीं राम-लक्ष्मणांच्या शरीरांवर झालेल्या जखमा कौसल्यासुमित्रेच्या

पहिल्याच स्पर्शानें उलून आल्या होत्या. दरवाजानें आपल्या छाताडावर झेललेले तोफेचे गोळे मालकिणीच्या सजल दृष्टिक्षेपानें असेच कदाचित् टवटवून आले असतील—"

आम्ही पुढें निघालों. 'रुक्मिणी मंदिरा'जवळ येतांच ती थबकली. जीं जीं ठिकाणें ओळखीचीं म्हणून तिच्या हृदयावर कोरलीं गेलीं होतीं – त्या त्या ठिकाणीं थांबावयाचा तिचा बेत दिसत होता. आपल्या मागल्या वैभवाचीं चित्रें फाटलेल्या पुस्तकांतून पाहत असावी बिचारी !

मुख्य 'राजवाड्या' जवळ येतांच तिला एक हुंदका आला. १८१८ सालची ३० तारीख आठवली असेल काय तिला ?—

—कल्पनेनें उभ्या केलेल्या जगांत तिला त्यावेळीं 'बाकाबा'-चे हुंदके ऐकूं आले असतील. सरदार, मानकरी, मुत्सद्दी यांनीं वरपांगीं लवून इंग्रज रेसिडेन्टला कुर्निसात करतांना सोडलेल्या कढत निश्वासांची आंच तिला पोहोंचली असेल. तिनें अंग शहारल्यासारखें केलें. ती राजवाड्याकडे सारखी पाहत राहिली. तिच्या विशीर्ण मुखावर समोरील सिनेमागृहाच्या दिव्यांचा नीलिमा पसरला होता आणि डोळ्यांसमोर "**नरसिंह**" हीं अक्षरें कांचेच्या चौकटींत निळ्या प्रकाशांत आपल्याच हौसेंत चमकत होतीं.– कुणाचें हास्य असेल तें कोण जाणें ! !

'पाताळेश्वरा' च्या दरवाज्याच्या गाभाऱ्यांत तिनें मान

उंचावून पाहिलें. चिमण्यांच्या घरट्यांतून कापसाचे सुताडे लोंबत होते, चार दोन भिकारी खालच्या कपारींत झोंपले होते. ती पुढें निघाली.

'**नील सिटी स्कूल**'! '**बाकाबाईचा राजवाडा**' म्हणून गाजलेली ती इमारत!! तिथें शिकूनसंवरून तयार होणाऱ्या भावी पिढीवर वास्तुदेवतेनें कोणत्या आशा उभारल्या असतील ?—

“ नाहीं रे बाळ, '**बाकाबाई**'ची इच्छा नव्हती राज्य जावें म्हणून! '**आप्पासाहेबां**' चा हेवादावा होता तिला. बाईची जात पडली बिचारी. ते पाहा तिच्या विशाल भालावरील केंस कसे विस्कटून गेले आहेत; तिचे टपोरे डोळे पाहा कसे ओले झाले आहेत. महत्त्वाकांक्षी होती म्हणून फसली. तिच्यापेक्षां जास्त कर्तृत्ववान आणि राजकारणी म्हणविणाऱ्या पुरुषांनींहि ह्याच चुका केल्या आहेत. कुणी कुणाला दोष द्यावा?—” एक दीर्घ उसासा— अस्फुट कां होईना— पण ती भराभर बोलून गेली आणि त्याच पावलीं '**केळीबागे**'कडे वळली.

'**केळीबागे**'च्या देवळांत दाराजवळ येतांच तिला काय वाटलें न कळे; पण ती आंत गेली नाहीं—'**माझी अन्नपूर्णा**' ” ×

× तिसऱ्या रघुजीची पत्नी

भरली कळशी घेऊन पूजेला आलेली थोडीच दिसणार आहे मला ? एकादी पाकोळी देवळाच्या गाभाऱ्यांत भिरभिरत असेल–" आतां तिचा रोख कुठें होता हें मला कळलें नाहीं. रस्त्यानें ती कांहींतरी पुटपुटत असे. मधूनच एकादा हुंदका येई तिला कधीं कधीं – ती खूप घाईनें चालून जाई.

'**रुक्मिणी मंदिरा**'च्या दारावर मला एकट्यालाच उभा करून ती आंतून फेरफटका करून आली. आणि नंतर मला तिनें सरळ राजाच्या कोठीजवळच थांबविलें.

चांदण्यामध्यें ते काळे फत्तर अधिकच भेसूर दिसत होते. प्राण निघून गेल्यावर पूर्वीचा वान फक्त तोंडावर घेऊन निस्तेज पडलेल्या प्रेताची कळा त्या जागेला आली होती. लांबवर दिस-णाऱ्या दबक्या दरवाजांत पहारेकऱ्यांचें घोरणें ऐकूं येत होतें–

"ती पाहा"–तेथील '**हत्तीखान्या**'च्या दरवाज्याकडील एका साध्या जागेकडे तिनें बोट दाखविलें. कांहींतरी सांगायचें होतें तिला; परंतु–तिच्या मुखांतून शब्द बाहेर येत नव्हता. बराच वेळ ती नुसतीच रडत होती. हळूहळू ती एकेक शब्द बोलूं लागली–

"माझा आवडता हत्ती '**माणिक**' या इथेंच पुरला. माझ्या-प्रमाणेंच त्याचाहि आत्मा इथंच कुठंतरी घुटमळत असेल. माझ्या माणिकनें कितीतरी वेळीं मला सुरक्षित पोंचविलं होतं. माणिक

गेला व माझा आधार तुटला. ही कपाळकरंटी मी आतां येथें फिरते आहे वणवण. 'माणिक'! केव्हां जीवंत होशील रे तूं"–

आतांपर्यंत धरून ठेवलेला सोस तिला असह्य झाला होता. दर अवसेपुनवेला आपले डोळे असे झरविणारी बिचारी वास्तु-देवता कधींतरी कुणा मराठ्याच्या स्वप्नांत आली असेल का? हिंदु विधवेसारखी असहाय आणि अगतिक झाली होती बिचारी–

'**सक्करदऱ्या**'चे रोखानें वळून आणि जवळच्या बोळांतून मार्ग काढून तिनें भोसल्यांच्या स्मशानांत पाऊल घातलें. त्या 'छऱ्यां'जवळ येतांच ती देहभान विसरली. माझें अस्तित्वहि तिच्या दृष्टींतून निघून गेलें–

"ही महाराजांची स्वारी,* हा माझा रघू,+ ही काशी–ही कमळजा, ही सकवार–" ती एकाद्या हरिणीसारखी ह्या समाधीपासून त्या समाधीपर्यंत धांवत होती. त्या समाधी जुनाट झालेल्या–कधीं कुणाचें त्यांच्याकडे लक्षहि न पोचलेलें. दाराच्या फळ्या मोडलेल्या. रस्त्याच्या बाजूच्या चिंचेच्या झाडावरून मधूनच एकादें घुबड ओरडावयाचें. कुणाला तमा होती या गोष्टीची??......

* पहिले रघुजी भोंसले

+ रघूजी

मी तिच्याकडे पाहिलें. तिची माझी दृष्टादृष्ट झाली.

—ती खदखदा हंसत सुटे, तर कधीं कधीं सावर सोडून एकाद्या समाधीवर डोकें आपटून ढसढसा रडावयास सुरवात करी. ज्यांनीं आपल्या कणखर कर्तबगारीनें तिला वश केलें आणि राजविलासांत तिच्याशीं जलक्रीडा केली– ज्यांनीं तिला मातेसमान मानून तिच्या पांघरुणाची आशा केली– ज्यांनीं तिच्या सुखांत सुख पाहिलें त्या तिच्या पतीची, तिच्या मुलांची, तिच्या सख्यांची ती पुनर्भेट ! कुणाला भडभडून येणार नाहीं तें सगळें पाहून !

ती एकदम पुढें निघाली, व मागून यावयास तिनें मला खूण केली. जवळच्या कण्हेरीचीं ओंजळभर फुलेंपानें तिनें मला दिलीं आणि स्वतः पण घेतलीं–" जाऊं देरे ! आपणच करावयाच्या या गोष्टी "–प्रत्येक समाधीवर भक्तिभावानें फुलें वहातांना तिच्या कंठांतून कसले तरी भरलेले उद्गार निघत होते. त्यावेळीं तिथें झोंपलेल्या महाभागांच्या आत्म्यांना खरंच काय वाटलें असेल !

झाडावरून पुन्हां एकदां घुबड ओरडलें. आम्ही '**रघूजी**'च्या समाधीवरून दचकून डोकें उचललें.

' देवी ! चलावं आपण ! " मी तिला नम्रपणें विनंती केली.

" येईन पंधरा दिवसांनीं," असेंच कांहींसें ती आवेगांत म्हणाली.

आमचा रोख '**सक्करदऱ्या**'कडे होता. मध्यंतरींच्या वस्तींत कुत्र्याच्या भुंकण्याखेरीज कसलाहि आवाज ऐकूं येत नव्हता. याच रणमैदानावर विजयाचीं मंगल वाद्यें कैक वेळां निनादलीं असतील; फितुरी लोकांचीं प्रेतें याच भूमीवर घारी-गिधाडांनीं फस्त केलीं असतील.

आज जग सारें बदलून गेलें होतें !!

—'**सक्करदऱ्या**'च्या आडव्या रस्त्यानें आम्ही कम्पौंडच्या आंत शिरलों. झाडांच्या पानांपानांतून पुनवेचा चंद्र आमच्याकडे पाहण्याचा प्रयत्न करीत होता. दिंडी दरवाजाजवळ आम्ही जाऊन पोहोंचलों. आंतल्या महालांत राजेसाहेबांचा मुक्काम होता. आम्हा मराठ्यांचा अभिमान–विषय सुखांत आणि विलासांत झोंपला असेल—

" नाहीं ! नाहीं ! तो सुखांत झोंपला नाहीं. "

तिनें जणुं माझ्या मनांत उद्भवणारे कल्पनातरंग अचूक हेरले होते. मी विस्मयानें तिच्याकडे पाहूं लागलों.

" नाहीं बाळ ! तो सुखांत निजला नाहीं रे; आंतला कांटा त्याच्याहि जीवाला खुपतो आहे ! एकादे वेळीं झोंपेंत मी त्याला

दर्शन देतें. काय त्याची अवस्था होते त्यावेळीं, याची कल्पना नाहीं तुला. काळजाच्या आंतल्या गाभ्याला जखम होऊन त्यांतून रक्ताचा लोट वाहावा—त्याच वेदनेंत तो विवळत राहतो. थांब तूं जरा वेळ ! मी येतेंच त्याला भेटून ! ! " तिच्या त्या वाक्यांत मातेचा जिव्हाळा सामावला होता.

हिंस्र श्वापदांच्या पिंजऱ्यांतून जीव गुदमरून टाकणारी घाण येत होती. एक डुरकावणी ऐकूं आली. पिंजऱ्यांतला वाघ तो !— विचित्र कल्पना चमकून गेली.

मला फार वेळ उभें राहवें लागलें नाहीं. ती संथ गतीनें बाहेर आली. दर अवसेपुनवेला ही इथें येऊन काय बरं करीत असावी ?

नंतरचा रस्ता कोणता हें मला मुळींच समजलें नाहीं. माझे पाय जमिनीवर नव्हते. आपण कुठेंतरी उडून जातों आहों असा मला भास झाला. भास नव्हे, खरेंच होतें तें? कारण माझे पाय जमिनीला लागून मी आजूबाजूला पाहूं लागलों तों मला आढळून आलें कीं, आम्हीं '**तेलंगखेडी**'च्या बागेंत दाराच्या कमानींत उभीं असून देवी शून्य दृष्टीनें ती बाग पाहत आहे.

" हें आमचं विलासमंदिर ! " आंतील बंगल्याकडे बोट दाखवीत ती म्हणाली, " पण नको ती आठवण. 'अप्पासाहे-

बा'ला गादी मिळवावयाची होती—त्याचा स्वार्थ—त्याचा लोभ. ह्याच बंगल्यांत इंग्रजांच्या कागदांत त्यानें शाई भरली—तह झाला आणि माझ्या कपाळाचं....'

पुढें तिच्यानें बोलवेना. जड पावलांनीं ती बागेच्या बाहेर येऊन '**तेलंगखेडी**' तलावाकडे जाऊं लागली. बुरुजाच्या त्या लांब फळीवर आम्ही दोघेंहि उभीं राहिलों. तलावाच्या दुसऱ्या बाजूचा किनारा बिलवरी आरशाला बसविलेल्या काळ्या चौकटीसारखा दिसत होता. वाऱ्याच्या गार झुळकीनें तिचे केस विस्कटून उडत होते. तिचा पदरहि निशाणासारखा फडफडत होता.

"विसरू या बाळ आपण ह्या साऱ्या गोष्टी. एकादेवेळीं मन उगीच उबाळून येतं. त्यावेळीं कुणीतरी सहानुभविता असावा असं वाटतं. आज तूं माझ्याबरोबर आहेस. ज्यांच्या ज्यांच्याबद्दल मला विश्वास वाटला, त्यांच्या त्यांच्या स्वप्नांत मी गेलें. पण कुणीहि मला आश्वासन दिलं नाहीं. प्रत्येकानें माझ्या पायावर डोकं ठेवलं आणि गाईसारखा हंबरडा फोडला. काय करतील बिचारे......"

दाटून आलेला आंवढा तिनें कसाबसा गिळला. आणि गुदमरलेल्या आवाजांत दोनच शब्द मला ऐकूं आले. "माझी प्राणप्रतिष्ठा....प्र—स्था...प—ना...."

ती गुप्त झाली ! !

× × ×

पक्ष्याच्या कर्कश आक्रंदनानें मी जागा झालों. बहुधा तो पक्षी सापाच्या तावडींत सांपडला असावा. आणि साप त्याला गिळीत असावा ! ! अंतःकाळच्या वेदना त्याच्या त्या ! !

माझा जीव धडधडला; कासावीस झाला. झपाझप पावलें उचलीत मी घरचा रस्ता कापूं लागलों.

चंद्र पिंवळा पडला होता.

---

—१६—

# पोर

ती पाठमोरी बसली होती. तिच्यापुढें कसलें तरी पुस्तक होतें—रीडर होतें तें. त्यांतील कांहीं वाक्यें ती अडखळत वाचीत होती. तिला शब्द अडला म्हणून तिनें वहींत पाहिलें, Golden–सोनेरी.

मी बराच वेळ उभा होतों. तिचें लक्ष जावयाचे अगोदर माझ्या हातांतील फोटो मी तिच्या समोर ठेविला. किती तरी वेळ ती त्या फोटोकडे पाहत होती. तिला खूप आनंद झालेला दिसत होता. तिचे डोळे लहान मोठे होत होते.

तो फोटो दुसऱ्या कुणाचाच नव्हता. तिचाच; पण निराळ्या वेषांत! तो पांढरा शुभ्र साफा तिला अगदीं खुलून दिसत होता आणि त्या पेहरावांत ती एकाद्या तेरा-चवदा वर्षांच्या उमद्या, सुंदर आणि निरोगी अशा शीख मुलासारखी दिसत होती. किंचित् मार्दव थोडें अधिक!

तिला फोटो आवडला हें माझ्याजवळ थोडेंच कबूल करणार होती ती! लागलीच तिनें चर्या बदलली आणि–" अहा!

ह्याच का तो सुंदर फोटो " असें म्हणून वेडावण्याच्या आविर्भावानें ती मनसोक्त हंसली.

"बरं, लते, आतां माग मला कांहीं घेऊन! चोर–" असें म्हणून मी तो फोटो हिसकून घेतला आणि " नाहीं बोलत जा तुझ्याशीं " असें लटक्या रागानें म्हणत खोलींत गेलों. ती हंसतच होती.—

—आणि खरोखरच रागानें मी जरी घुमदून बसलों असतों तरी ती मला थोडेंच बसूं देणार होती? खट्याळ पोर ती! दिवसभर तिची टकळी बंद झालेली या आठ दिवसांत मी कधींच पाहिली नव्हती. आणि आतां काय – तिला इंग्रजींतून What is your name? म्हणून विचारतां येत होतें. दिवसांतून कमींतकमी पांच-सातदां तरी ती मला हा प्रश्न विचारायचीच.

थोड्याच वेळानें ती माझ्या खोलींत आली. मला खराच राग आला कीं काय हें पाहण्याकरतां ती किंचित्काल दारांत उभी राहिली. अगदीं हुबेहूब आत्यासारखा तोंडवळा होता तिचा. गाल खूप फुगीर–ते इतके कीं नाक चांगलें सरळ असून किरकोळ वाटे. डोळेहि नाहीं म्हणावयास अगदींच लहान नव्हते; पण ती हंसावयास लागली कीं त्या गुलाबाच्या पाकळ्यांनीं ते झांकले जात आणि किलकिले दिसत.

ती दारांत उभी आहे हें मला दिसत होतें. मी गंभीर चर्या केली. पण चाणाक्ष पोरटी ती ! तिनें रागरंग ओळखला. माझा राग कशानें जाईल याचा तिनें उपायहि शोधला होता. ती भुर्रकन् माझ्याजवळ आली आणि माझा लोड करून ऐटींत बसली.

" बरं, आज मी पाहतेंच तुझं माझ्यावर किती प्रेम आहे तें. पाहूं तुझा हात—"

तिनें खिशांतील एक बांगडीचा तुकडा काढला आणि माझ्या तळहातावर कटकन् मोडला. एक-दोन कण माझ्या तळहातावर पडले.

" दोनच कण ! इतकाच तुझा लोभ !! म्हणून तर रागावतोस माझ्यावर तीन–तीनदां. " आतां तिला राग आलासें दिसलें.

तिची ही प्रेम अजमावून पाहण्याची अगदीं नवीनशी रीत मोठी मजेदार दिसली. त्या बांगडीचे दोन तुकडे होतांना खालीं फार तर एक-दोनच कण पडणार—मला रागाचा आव कायम ठेवणें शक्य झालें नाहीं.

" तसा नसतो करायचा लोभ ! हा असा बरं लताताई "— मीं तिचे गालगुच्चे घेतले; देठीं पक्के होते म्हणून—नाहींतर फुलेंच हातीं आलीं असतीं !!

वातावरण निवळलें आणि आम्हीं फिरावयास गेलों. उन्हाळ्याची संध्याकाळ ! उष्मा कमी झाला नव्हताच ! मी तिला मोठ्या रस्त्यानें न नेतां टेकडीच्या पायथ्यानें नेलें आणि टेकडी दाखवून आणली. रस्त्यांत एक मोठें वडाचें झाड होतें. आणि त्यांतच एका पांढऱ्या देवळानें दडी मारली होती. मी तिला तें मुद्दाम दाखविलें. काल त्या रस्त्यानें परत येतांना किंचित् काळोख पडला होता. पण तेव्हां तिला कितीतरी भीति वाटली तेथें ! आज उजेडांत तें तिला दाखवितांच ती लाजली. मी तिला भित्री म्हणून चिडवितांच तिला हंसूं आवरेना.

भिणें वाईट आहे वगैरे तिला सांगण्यापेक्षां तिच्या त्या निष्पाप मनोहर हंसण्याकडे पाहण्यांतच आनंद होता. त्या हंसण्यांतच तर सारी जादू होती ! !

त्यावेळीं चालतां–चालतांच तिनें मला कितीतरी नवीन माहिती सांगितली. मी इतकें वाचलें पण मला त्यांत ती कधींच सांपडली नसती. कुठें " सत्याचे मार्ग "–कुठें "परमानंदाची पूर्वतयारी"–कुठें कांहीं, कुठें कांहीं– शेंकडों पुस्तकांचीं मी पारायणें केलीं असतील, पण इतकें जीवंत तत्त्वज्ञान मला कुठेंच सांपडलें नव्हतें. आणि म्हणूनच लता मला इतकी आवडत होती.

तिच्या प्रत्येक वाक्यानें मला एका बालिश, चंचल, निष्कलंक हृदयाची ओळख पटत होती. ज्या गोष्टी कांहीं वर्षांपूर्वी माझ्याजवळून हरपल्या होत्या त्या कुठें आहेत–असतात हें कळत होतें. तिची टकळी सुरू होती.

––तिच्या रीडरचें वरचें कव्हर वसंतानें खराब केल्यामुळें तिनें तें फेकून दिलें होतें आणि माझ्याजवळून नेलेलें गुलाबी कव्हर गोंदानें पक्कें बसविलें होतें. सकाळीं आंबे खातांना तिची अस्मानी रंगाची साडी खराब झाली, ती तिनें आत्या रागावेल म्हणून गुपचुप धुवून टाकली होती. वसंतानें पत्त्याचे डाव मांडतांना केलेली त्याची लबाडी तिनें ओळखली होती; व तो चिडल्यामुळें खेळांत बिघाड आला होता. खेळांत असें चिडूं नये.

––आज आपल्यांकडे जायचें म्हणून आईनें सांगितल्यावर तिनें नवा ब्लाऊझ काढला होता आणि साडी नेसून झाल्यावर ती आरशांत पाहत असतांना तिच्या वहिनीनें–" अहा, ! लताताई, कुणी पाहायला का येणार आहेत ? आतां आलंच बरं–लवकर–" असें चिडविलें म्हणून तिला राग आला होता आणि माझा धाक दाखविल्यावर तिनें थट्टा बंद केली होती........

कितीतरी ताज्या बातम्या सांगितल्या तिनें मला. आम्ही नदीच्या वाळवंटांत बसलों होतों. कांठची वाळू ओलसर होती.

तिनें ती आपल्या दोनीहि पायावर दाबून दाबून बसविली आणि हळूंच पाय काढून घेतले.

—" लते ! आतां लहान आहेस तूं मातींत खेळायला ? आतां चांगली चवदा वर्षांची झालीस तूं. "

—" मग काय ? आमच्या गांवाला नदीच नाहीं म्हणून. अन् तूं नाहीं का सकाळीं माझ्याबरोबर दोरी खेळलास ? वहिनींना मीं सांगितलें तेव्हां त्या म्हणाल्या !–' फार शहाणे आहेत तुझे बंधुराज–' " ती पुनः हंसली. मला तेंच पाहिजे होतें.

रविवारचा दिवस तो. आत्या गुरुवारीं जाणार होती. पण आमच्यापैकीं कुणीच तिला जायची परवानगी देईना. आमचें बोलणें मोठ्यानेंच सुरू होतें. इतक्यांत आपल्याशींच दंग झालेली लता माझ्याजवळ आली. तिनें आपलीं गुलाबी नखें माझ्यासमोर धरलीं—

" बापू हें पाहा बगळयाचें दूध–" तिच्या तर्जनीच्या नखावर पांढरा डाग पडला होता.

" तुझीं नखं पाहूं—" तिनें पुनः विचारलें. माझ्या नखांवर कांहींच नव्हतें आणि तीं तितकीं गुलाबी पण नव्हतीं.

" अग, सुंदर मुलींनाच बगळ्याचं दूध मिळतं अन् त्यांना नंतर त्याच्याशीं लग्न करावं लागतं. हें पहा लते, तूं बगळ्याची

बायको झाल्यावर तुला तिथें वाळूंत खूपशा झोपड्या बांधतां येतील पायावर–"

" हं, अन् मग त्या झोपड्यांत ये तूं नि वहिनी–" तिला उगीच राग आला होता. मी वसंताएवढा असतों तर तिनें त्यावेळीं मला खात्रीनें फाजील किंवा वात्रट म्हणून अहेर केला असता.

त्याच रात्रीं आम्ही अंगणांत गप्पा मारीत बसलों होतों. घराण्याच्या जुन्या गोष्टी निघाल्या होत्या. लतेला झोंप लागली होती. तिची वहिनीहि तिथेंच झोंपेला येऊन निजून राहिली.

सारी निजानीज झाल्यावर मी दिवा जवळ ओढला आणि नुकताच आलेला 'पारिजात'चा अंक चाळूं लागलों. " शास्त्र-ज्ञाचा शेवट " हें त्या लघुकथेचें नांव. माझी ती अर्धी–मुर्धी वाचून झाली होती, इतक्यांत—

" बरं, सोडून तर पाहा. काय होतं तें–होईल माझं पातळ ओलं—"

मी दचकून आजूबाजूस पाहिलें. लतेला गाढ झोंप लागलेली दिसली. पण बोलत तीच होती. अगदीं तेंच वाक्य ती दुपारी बोलली होती. वाळ्याच्या ताटीवर हँडपंपनें मी फवारे सोडीत

होतों. लता जवळच उभी होती, कांहीं तरी बोलायचें म्हणून मी तिला विचारलें–

" लते, समज हा फवारा असाच तुझ्या तोंडावर सोडला तर ? पाहूं बरं तूं किती मोठ्यानें रडतेस ती. मी तुला रडतांना पाहिलंच नाहीं. "

" वा अन् माझे केंस ओले होतील ते ? "

" अन् तुझं तोंड भरगच्च भरल्यावर तूं डोळे मिचकावशील ते ?–किती सुंदर दिसशील तूं ! ?–"

" बरं सोड, सोडून तर पाहा, होईल माझं पातळ ओलं–"

अगदीं हेंच तिला दिसत असावें. ' ध्यानीं मनीं जें असायचें तेंच स्वप्नीं. '

किती–किती निष्पाप पोर–! !

मला आश्चर्य वाटे. लता इतरांच्या दृष्टीनें—आत्याच्या, माझ्या आईच्या दृष्टीनें— साडी नेसायला लागली होती, तेरा-चवदा वर्षांची झाली होती. कुमारी आणि युवती यांच्या मध्येंहि तिनें पदार्पण केलें होतें. आणि तरीहि इतकी अल्लड ! आतां कुठें तिला मैत्रिणी मिळत होत्या; आतां कुठें तिला आपला अंबाडा व्यवस्थित बांधतां येत होता. अल्लड, निष्पाप, फुलपांखरासारखी हांवरी, चंचल, आनंदी ! नेहमीं हंसायचें– नेहमीं मौज ! कुणीं कांहीं विचारलंच तर चटकन् उत्तर द्यायचं– आणि तें सुद्धां इतकें

समर्पक कीं कुणालाहि वाटावें, पोर किती तल्लख आहे. किती सुख असतें अशा मनोवृत्तींत ! किती आनंद असतो अशा बेफिकिरपणांत ! ! किती मौज– किती गोड जीवनकाल असतो तो !!!

* * * * *

लतेचा शीख मुलाच्या वेषांत असलेला फोटो माझ्या खोलींत मी तिच्या वहिनीच्या फोटोजवळ ठेवला होता. रोजच्यासारखें सुरू झालें सारें. रोजचा तोच कार्यक्रम – तेच व्यवसाय – तेंच कॉलेज – त्याच गप्पा – सहज, अगदीं नकळत दिवस निघून जातात.

यंदाचें सहावें वर्ष माझें ! परीक्षा उद्यांपासून सुरू व्हायची, पण कांहींतरी भानगडी होऊन ती आठ दिवसांवर गेली. आजचें मरण उद्यांवर टळलें या आनंदांत मी घरीं आलों. टेबलावर हॅट फेंकली त्यासरशी त्यावर ठेवलेलीं दोनीहि पत्रें खालीं उडालीं. पोष्टाच्या शिपायानें तीं खिडकींतून फेंकलीं असावींत––

त्या पत्रांपैकीं एक बंद पाकीट होतें. लतेच्या वडिलांचेंच अक्षर. दुसरी एक पत्रिका होती. पाकीट फोडायचे अगोदर मी पत्रिका वाचूं लागलों. अशा कितीतरी लग्नपत्रिका येत असत; पण–

मला स्वतःला त्यावेळीं इतकें आश्चर्य वाटलें कीं माझ्यानें ती पत्रिका पूर्ण वाचूनहि झाली नाहीं ! एकदम माझ्या तोंडून उद्गार निघाला––

"सौभाग्यकांक्षिणी......आणि.......लता ? ? "

भिंतीवरच्या फोटोंत लता हंसत होती. तिचे फुगीर गाल, रेशमी साफा, तिच्या तोंडावर फुललेलें मार्दव......सारें तसेंच होतें ! !

मला कुणीतरी कुठेंतरी ओढून नेत आहे असें वाटलें. लतेच्या फोटोकडे मी पाहत होतों.

" लते, तुला या पत्रिकेचा अर्थ तरी समजला का ? "

लतेच्या वहिनीनें आतुरतेनें माझ्या हातांतील पत्रिका घेतली आणि आपली विस्मयगर्भ दृष्टि त्या अक्षरावरून फिरविण्यास सुरवात केली.

ता. २१-६-३४

---